# चित्रशाळा

(तीन अंकी नाटक)

लेखक
नाना जोग

किंमत १॥ रुपया

# प्रस्तावना

माझे मित्र श्री. नाना जोग यांनीं हें नाटक फक्त कलेकरितां किंवा करमणुकीकरितां लिहिलेलें नाही. जोग हे कलावन्त आहेत, रसिक आहेत, पण ते 'कलेकरितां कले' चे उपासक नाहीत. ते साम्यवादी पक्षाचे–कम्युनिस्ट पार्टीचे–रीतसर सभासद नाहीत. पण त्यांचा कल साम्यवादाकडेच आहे. अर्थात् ते गमतीखातर किंवा आपल्या हृदयाची कलासंवेदना तृप्त करण्याकरिता कांहीं लिहितील हें शक्य नाहीं. एका विशिष्ट विचारसरणीचें प्रतिपादन नकळत व बेमालुमपणें करतां आलें तर करावें या बुद्धीनेंच त्यांनीं लेखणी हातांत घेतली. पण 'स्वभावस्तु प्रवर्तते' या न्यायानें त्यांच्यांतील कलापुरुष दुर्दम्य ठरला. या नाटकांत तो मधूनमधून कितीदां तरी सारखा डोकावतो. त्यामुळें या नाटकाचें प्रचारकी स्वरूप बरेंच सौम्य झालें आहे. तें वाचल्यानंतर मनावर सांप्रदायिक साम्यवादी विचारसरणीचा ठसा उमटत नाही; मानवोचित सहृदयता व सहानुभूति मात्र जागी होते.

एका साम्यवादी वळणाच्या गृहस्थानें आपल्या मतलबासाठीं नाटक लिहावें आणि त्याला मी प्रस्तावना लिहावी, यांत जोगांच्या धूर्तपणाचें कौतुक करावें कीं माझ्या भोळेपणाची कींव करावी असें कित्येकांना वाटेल. आणि तसें वाटावें यांत नवल नाहीं. कारण कुठल्याहि नाटकाकरितां माझ्याजवळ प्रस्तावना मागण्याची बुद्धि होणें स्वाभाविक मुळीच नाहीं. मग माझ्याजवळ प्रस्तावना मागण्यांत जोगांचा हेतु काय असावा ? तो अगदीं स्पष्ट आहे. पण स्पष्ट हेतूहि लपविण्याची पुष्कळांना गरज वाटते. तशी

ती जोगांना वाटली नाहीं. त्यांनी तो हेतु मला सांगितला आणि मला तो पटला. साम्यवादी वळणाच्या माणसाचें नाटक म्हणूनच त्यांच्या नाटकावर सरकारची विनाकारण इतराजी होऊं नये व प्रकाशकाला धास्ती वाटूं नये म्हणून त्यांनी मला गांठले. स्नेहाखातर तत्त्वाचा त्याग करूं नये हा नियम मला मान्य आहे. मी यथाशक्ति त्याचें पालनहि करतों. पण तत्त्व न सोडतां जर स्नेहाला जागतां आलें तर जागणें सभ्यपणाचें लक्षण आहे असा माझा समज आहे. म्हणून मी जोगांच्या नाटकाला प्रस्तावना लिहिण्याचें कबूल केलें. याहून निराळा अधिकार प्रस्तावना लिहिण्याच्या बाबतीत मला नाहीं. पण प्रस्तावनाकार अनधिकारी असला म्हणजे नाटककारहि तसा असलाच पाहिजे असें थोडेंच आहे ? यांत कौतुकच करायचें झाल्यास जोगांच्या प्रांजलपणाचें करावें आणि कीवच करायची झाल्यास माझ्या मित्रभावाची करावी.

गरीबी व श्रीमंती मनुष्यनिर्मित नसून ईश्वरनिर्मित आहे असा जुन्या नीतिशास्त्राचा संकेत होता. तें पूर्वकर्माचें फळ आहे असें हिन्दूनें मानावें, तकदीर आहे असें मुसलमानानें समजावें, आणि ' देशांतून गरीब नाहीसे होणें शक्य नाहीं ' (The poor shall never cease from out of the land ) या वचनावर ख्रिस्त्यांनी श्रद्धा ठेवावी. पूर्वीच्या नीतीशास्त्रज्ञांनीं ' प्रामाणिकपणानें श्रीमंत व्हा किंवा समाधानानें गरिबींत रहा ' (Be honestly rich or contentedly poor) असाच उपदेश केला. धर्म व नीति यांची अशी शिकवण असल्यामुळें गरिबांनी श्रीमंतांचा हेवा करूं नये आणि श्रीमंतांनीं गरिबांवर दया करावी हेंच सुसंस्कृत जीवनाचें लक्षण मानलें जात असे. गरिबांविषयी कळवळा व कीव उत्पन्न करणें हाच साहित्याचा उदात्त हेतु असे. दीनांविषयीं करुणा, अनुकम्पा जागृत करणारीं काव्यें, नाटकें व लेख उत्कृष्ट समजलें जात. गरीबी व श्रीमंती कधीच नाहीशी होणे शक्य नसल्यामुळें श्रीमंतांनीं दान करून गरिबांच्या यातनांची तीव्रता कमी करावी यांतच श्रीमंतांची थोरवी होती.

पण आतां सर्वांच्याच वैचारिक भूमिकेंत क्रांतिकारक बदल झालेला आहे. **गरीब–श्रीमंत हा भेद स्वाभाविक किंवा देवानिर्मित नसून औपाधिक व मानवकृत आहे याविषयीं आतां वाद राहिलेला नाहीं.**

**म्हणून आतां गरिबांच्या मनांत दया–याचना किंवा कृपाकांक्षिता उत्पन्न करण्याऐवजीं तीव्र असंतोष, आत्मप्रत्यय व प्रतिकारशक्ति जागृत करणें साहित्याचा हेतु असला पाहिजे. श्रीमंतांच्या मनांतहि करुणा किंवा अनुकम्पा उत्पन्न करण्याऐवजीं सहानुभूति व अनुताप जागृत करून उपरति आणि आत्मविसर्जनाची वृत्ति निर्माण केली पाहिजे.**

**जे लोक विपन्नावस्थेंत आहेत त्यांच्याकडून होणारा अतिरेक क्षम्य ठरविण्याचा हेतु या नाटकाचा आहे हें स्पष्टच आहे. पण श्रीमंत म्हटला कीं तो जात्याच क्रूर किंवा दांभिक अथवा उफराट्या काळजाचा व विपरीत बुद्धीचा असतो अशी छाप त्याच्या वाचनानें मनावर पडत नाहीं. संपन्न वर्गाकडून परंपरागत संस्कारामुळें व परिस्थितीमुळें कळत–नकळत जे अतिरेक होतात त्यांचें समर्थन करणें जितकें अश्लाघ्य आहे तितकें सत्ताहीन, संपत्तिहीन व मान्यताहीन वर्गाच्या अविवेकाचें समर्थन निंद्य खास नाहीं.**

सत्ता, मत्ता व मान्यता या तिन्ही सामाजिक प्रतिष्ठांना मुकलेलीं माणसें माणुसकीलाच पारखी होतात. या नाटकांतील गोविंद म्हणतो त्याप्रमाणें त्यांना ‘ माणुसकी परवडतच नाहीं. ’ त्यांना नीतीची चाड नसते, लौकिकाची दरकार नसते, पाप–पुण्याची पर्वा नसते, किंबहुना त्यांना ती कळतहि नाहींत. समाजांतील सभ्यतेचे नियम प्रतिष्ठित वर्गातील व्यक्तींच्या परस्परांतील व्यवहारापुरतेच अमलांत येतात. अप्रतिष्ठित वर्गातील व्यक्तीशी वागतांना संभावित माणसें देखील त्या नियमाचें पालन न करणेंच प्रतिष्ठितपणाचें लक्षण मानतात, याचा अनुभव या अप्रतिष्ठित वर्गाला प्रत्यही येतो. म्हणून त्या वर्गाला संभावितीची व संभावितांची कदर वाटत नाहीं.

एकंदरींत दोन्ही वर्गाच्या लोकांच्या हृदयावर व मेंदूवर त्यांच्या ‘ पोटा ’–चाच परिणाम झालेला दिसतो. भुकेलेल्याच्या कल्पवृक्षाला स्वादिष्ट व पौष्टिक खाद्यपदार्थ लागतील, तर जो धनभाज झाला असेल त्याच्या कल्पवृक्षाला मोत्यें व माणकें लागतील. एकाचें अन्न हेंच परब्रम्ह असतें तर दुसऱ्याचें

ब्रम्हज्ञान 'तत्त्वमसि' वर आधारलेलें असतें. सम्पन्न वर्गाच्या ठिकाणीं जी नैतिकता व सभ्यता भासते ती देखील नकली व तकलुपी असते. 'कल्चर'ची म्हणजे 'कमावलेली' देखील नसते. एवंच काय, कीं ज्याला आपण सद्गुण किंवा शील म्हणतों तें दरिद्रयाला परवडत नाहीं आणि श्रीमंताला किफायतशीर होतें तोंपर्यन्तच मानवते. एका निराळ्याच अर्थानें आजच्या धनसत्तात्मक युगाला 'सर्वे गुणाः कांचनमाश्रयन्ते' हें वचन लागू होतें.

या नाटकांतील जंगलूचें वर्तन या वस्तुस्थितीचें निदर्शक आहे. या नाटकांतील नायिकेवर ( शोभेवर ) केवढा भयंकर प्रसंग ओढवलेला असतो. पण जंगलूचें सारें जीवनच तशा भयंकर प्रसंगांची अविच्छिन्न परंपरा असल्यामुळें त्या तशा प्रसंगीहि आधी त्याचें लक्ष खाद्य–पदार्थाकडे जातें आणि अगदीं अबुद्धिपूर्वक, केवळ नैसर्गिक प्रेरणेनें तो ते पदार्थ खाऊन टाकतो. त्याच्या भुकेंत सर्व मानवोचित कोमलभावना भस्मसात् झालेल्या असतात. जंगलू हा दानव नाहीं, तो दुष्ट नाहीं, तो नतद्रष्टहि नाहीं. जिला आपण नैतिक प्रेरणा म्हणतों तिला त्याच्या ठिकाणी अवसरच उरलेला नाही.

जंगलूनें प्राप्त परिस्थितींत समाधान मानावें का, हा मुद्याचा प्रश्न आहे. त्याला तें शक्य आहे काय ? शक्य असलें तरी त्यामुळें त्याच्या माणुसकीचा विकास होईल कीं ऱ्हास होईल ? **नाइलाजांत, असहायतेंत समाधान मानल्यानें नीतीचा किंवा माणुसकीचा विकास होऊं शकतो असें कुणालाच दाखवून देतां येणार नाहीं.** सामाजिक परिस्थितीमुळें आजहि कित्येक लोकाना चाण्डालाचा धंदा पत्करून स्मशानांतच आयुष्य कंठावें लागतें. प्रेतावरील कापड वापरणें त्याच्या अंगवळणी पडलेलें असतें, चितेवर पानगे भाजतांना त्यांना खरोखरच दिक्कत वाटत नाहीं, प्रेताच्या टाळूवरील लोणीहि त्या पानग्यांना लावतांना त्यांना कांहींच वाटणार नाहीं. अशा लोकांनीं आपल्या वांटयाला आलेल्या या जीवनक्रमांत समाधान मानणें योग्य होईल का ? **दैन्यांत, हीनतेंत व पतितावस्थेंत समाधान मानणें म्हणजे अधःपाताचा कडेलोट आहे, ही गोष्ट या नाटकांत प्रकाश व गोविंद यांच्या संवादांत मोठ्या परिणामकारक रीतीनें मनावर बिंबविली आहे.** मिल् म्हणतो त्याप्रमाणें ' संतुष्ट डुकरापेक्षां असंतुष्ट मानव

करा. ' पण हें ज्यांच्या ठिकाणीं माणुसकीची जाणीव, किंबहुना आठवण देखील शिल्लक उरली असेल त्यांना.

एक दंतकथा आहे. एका गृहस्थाला स्वप्न पडलें, की आपण पुढल्या जन्मीं डुक्कर होऊन आपल्याच घराशेजारच्या गटारांत लोळत राहूं. त्यानें आपल्या मुलांनां बोलावून सांगितलें की मी मेल्यानंतर कांहीं महिन्यांनीं अमुक रंगाचें डुक्कर होऊन या गटारांत तुम्हाला दिसेन; त्या डुकराला मारून टाका म्हणजे माझी त्या घाणींतून सुटका होईल. पुढें, ठरलेल्या संकेताप्रमाणें जेव्हां त्या डुकराला मारून त्याची मुक्तता करायला ती मुलें आलीं तेव्हां तें डुक्कर गयावया करून म्हणाले, ' नका रे मला मारूं ! मला या घाणींतच कैवल्य मिळाल्याचें सुख वाटतें ! ' दैन्यांत, विपन्नतेंत व पतितावस्थेत समाधान मानण्याचें तत्त्वज्ञान हें इतकें भयानक आहे. गोविंद हा खराखुरा जातिवंत कामगार नाहीं. नाइलाजानें कामगार बनलेला तो एक मध्यमवर्गीय तरुण आहे. म्हणून त्याच्या ठिकाणीं तीव्र असंतोषाची, बंडखोरीची भावना तरी दिसते. बिचाऱ्या जंगलूला तेंहि भान राहिलेलें नाही.

गरीब-श्रीमंत हा भेद नाहीसा झाल्याखेरीज आतां मनुष्याचा सांस्कृतिक विकास होणें अशक्य आहे असेंच सर्व विचारवंतांचें निश्चित मत बनलें आहे. विज्ञान, कला व नीति यांचा विकास या विषमतेमुळें खुटला आहे हें त्यांनीं ओळखलें आहे. म्हणून धर्मनिर्णय मंडळाच्या अध्यक्षपदावरून विद्वद्रत्न भाऊजी दप्तरींसारखे धर्माचे प्रवक्तेहि धन ही संस्था नाहींशी केली पाहिज, धनावरील व्यक्तिस्वामित्व जाऊन त्यावर राष्ट्रस्वामित्व प्रस्थापित झालें पाहिजे असें प्रतिपादन करूं लागले आहेत.' अर्थमनर्थम् भावय नित्यम्' या तत्त्वाचाच त्यांनीं अधिक स्पष्ट व सुबोध भाषेंत अनुवाद केला आहे. मानवी किंवा नैतिक मूल्यांच्या स्थापनेकरितां आधी या विषमतेचा नायनाट करणें आवश्यक आहे याची साक्ष गांधींनाहि पटल्यामुळेंच त्यांनीं आपल्या एकादश व्रतांत अपरिग्रह व उत्पादक शरीरश्रम यांचा प्रामुख्यानें समावेश केला. कारण जो धनाच्या नादी लागला तो माणुसकीला मुकतो. ' पुत्रादपि धनभाजां भीतिः ' त्याचें जीवनविज्ञान कडचाकुलपांचें असतें. त्याच्यांत व इतर माणसांत रुपेरी भिताडें उभीं असतात. धनभाज हा मानवनिष्ठ बनूंच शकत नाहीं. ज्या समाजांत अशी विषमता असते त्या समाजांतील विज्ञान व कला

यांवरहि सोनेरी पडदा असतो. विज्ञानाचा व कलेचा उपयोगहि धनाच्या-द्वारें अधिक धन मिळविण्याकरितां होतो. ' हिरण्मयेन पात्रेण सत्यस्यापिहितम् मुखम्.

पण धन ही संस्था नष्ट झाली पाहिजे, याचा अर्थ सर्वांनीं दरिद्री झालें पाहिजे असा नाही. दारिद्र्य म्हणजे अपरिग्रह नव्हे, विवशता म्हणजे संयम नव्हे. असमर्थतेंत, असहायतेंत समाधान मानल्यानें माणुसकीचा ऱ्हासच होतो. **म्हणून ज्या समाजव्यवस्थेमुळें धनावर व्यक्तिस्वामित्व प्रस्थापित होतें व टिकतें त्या व्यवस्थेचा नायनाट करण्याची उमेद व शक्ति विपन्न व वंचित वर्गांच्या ठिकाणीं उत्पन्न करणें साहित्याचें व कलेचें उद्दिष्ट असलें पाहिजे.**

ज्याप्रमाणें जंगलूला माणुसकीचें भान उरलें नाहीं त्याच प्रमाणें तें प्रकाशला व अन्तूलाहि उरलें नाहीं. भंगिणीच्या टोपल्यांत खराट्याशेजारी बसलेल्या गुबगुबीत मुलाकडे पाहून प्रकाशची कलावृत्ति जागृत होते. याचें कारण त्या भंगिणीच्या जीवनांतील दारुण दुःखाची व कष्टाची जाणीवच त्याला नसते. पूर्व बंगालांत प्रवास करीत असतांना पोफळ-ताड-माडांच्या गर्द राईत सर्व बाजूंनी पुकुरानीं—लहानलहानशा तलावांनीं—परिवेष्टित गवती खोपटाचीं चिमकुली गांवें पाहून आम्हांला मोठी मौज वाटे. पण त्या डबक्याचें पाणी किती गढूळ असेल, तेथें डासांचा किती भयंकर उपद्रव असेल, त्या खोपटांत पावसाचा व ओलीचा किती त्रास असेल इकडे आमचें लक्षहि जात नसे. उलट आमची सौदर्यदृष्टि संतुष्ट व्हावी म्हणून तें दृश्य तसेंच रहावें असेंहि आम्हांस वाटावें ! आतां हिला कलादृष्टि म्हणावें कीं करालदृष्टि म्हणावें ? यांत हृदयांतील सौंदर्यभावना आहे कीं सौदर्यासुराची हृदयहीन आराधना आहे ? ही कला आहे की माणुसकीला तुडवणारी कालिका आहे ?

हाच विरोध गाधींच्या सहृदय वृत्तीला खपला नाही. गुरुदेवांना त्यांनीं अगदीं कळवळून सांगितलें कीं लक्षावधि भुकेलेल्यांच्या आक्रोशांत मला पाखरांचें संगीत ऐकूंच येत नाहीं हो ! बेकाराना दोन घांस देणाऱ्या चरख्यांत मला अधिक संगीत ऐकूं येतें. बायाबापड्यांचे श्रम हलके करणाऱ्या जात्यावरील ओंव्यां मला अप्सरांच्या संगीतापेक्षांहि मधुर वाटतात. **जी कला**

**प्रत्यक्ष जीवनांतून उत्पन्न होत नाहीं आणि जीवनाची शोभा व सुभगता वाढविण्याची जिच्या ठिकाणीं शक्ति नाहीं, ती कला एक कृत्रिम व काल्पनिक मायारूपी जग निर्माण करून माणसाला क्षणभर भुरळ मात्र पाडते.**

या विरोधाची जाणीव या नाटकांतील अन्तूला होते. तो प्रकाशच्या चित्रावर टीकाहि करतो. पण या विरोधाच्या मुळाला हात घालण्याची बुद्धि त्यालाहिं होत नाहीं. अमंगळ व अस्वच्छ जीवनाबद्दल कलावंताने तिटकारा उत्पन्न केला पाहिजे असें त्याला वाटतें. पण ज्या मूलभूत समाजव्यवस्थेमुळें तें दृश्य निर्माण झालें, तिचें निराकरण करण्याचा विचार अन्तूला सुचत नाही. चागल्याविषयीं आवड आणि वाईटाविषयी अरुचि उत्पन्न करणें कलेचें कर्तव्य आहे इतकेच त्याच्या नीतिवादी वृत्तीला वाटतें. पण अभिरुचीलाहि प्रत्यक्षाचा आधार लागतो याची त्याला जाणीव नसते. प्रकाशच्या कलात्मक दृष्टीला भंगिणीच्या मुलांत ' उज्ज्वल मानवतेची अस्फुट ठिणगी ' दिसते. ती पेटवावी असेंहि त्याला वाटत असतें. पण सामाजिक दडपणामुळें कोंडलेली ती ठिणगी भडका उडू न देतां कशी पेटवावी या विवंचनेंत तो असतो. शोभा म्हणते, " ती ठिणगी पेटली तर भडका उडाल्यावाचून राहणारच नाहीं आणि त्याला घाबरून चालणार नाहीं. " प्रकाशचे मन तिचें हें तत्त्वज्ञान एकदम स्वीकारायला तयार होत नाही. प्रकाशपुढें जो मूलभूत प्रश्न आहे तोच आपल्यापुढेंहि आहे. **मानवतेच्या या ठिणग्यांचा स्फोट न होऊं देतां त्यांच्यांतून ज्योत कशी निर्माण करतां येईल हाच क्रांतीचा 'यक्षप्रश्न' आहे. साम्यवाद्यांचें म्हणणें स्फोट अपरिहार्यच आहे. अहिंसात्मक क्रांतिवाद्यांचें म्हणणें स्फोट अपरिहार्यहि नाहीं आणि इष्टहि नाहीं. अर्थात् ती ठिणगी कोंडून व दडपून टाकण्याचा व विझविण्याचा सतत प्रयत्न करणारें दडपण मात्र दूर सारलें पाहिजे.**

आर्थिक विषमतेंतूनच हे प्रश्न, त्यांतील विसंगति व अनर्थपरंपरा निर्माण झाली आहे, यांत शंका नाहीं. सम्पन्न व विपन्न असे दोन वर्ग जोंपर्यंत आहेत तोंपर्यंत परस्परविरोधी स्वार्थसंबंधांचा संघर्ष टाळतां येणें शक्य नाहीं. वर्ग संस्थाच नाहींशीं केल्यावाचून हितविरोध नाहीसें होणार नाहींत हें उघड

आहे. विषम परिस्थितीमुळें दोन्ही वर्गांतील माणसांच्या प्रवृत्तींत, भावनांत व संस्कारांत आमूलाग्र भेद असल्याचें दिसून येतें. **परिस्थितीप्रमाणें माणसाच्या भावना बनतात, भाषा बनते, जगाकडे पाहण्याची दृष्टि बनते. म्हणून वर्गभेदजन्य आर्थिक विषमतेचा अन्त केल्याशिवाय अर्थभेदजन्य सांस्कृतिक विषमतेचा अन्त होणें अशक्य आहे. जोपर्यन्त नैसर्गिक संपत्तीवर व संपत्ति-निर्मितीच्या साधनांवर एका किंवा अनेक व्यक्तींची मालकी राहील तोपर्यंत या जगाला कौटुंबिक संसाराचें स्वरूप प्राप्त होणार नाहीं. तोंपर्यंत संसार हीं मालक व मजूर यांच्या परस्परविरोधी स्वार्थांचें रणांगणच राहणार.** या रणांगणाच्या प्रचंड आगीच्या डोंबांत सर्व मानवी मूल्यांची राखरांगोळी होऊं नये म्हणून प्रतिकार — साधनाच्या शुद्धतेचा आग्रह राखणें आवश्यक आहे. पण प्रतिकार अपरिहार्य आहे. ही गोष्ट ध्यानांत न आल्यामुळेच अन्तूच्या मनाची विलक्षण स्थिति झालेली आहे.

माणसाचें पोट नीट नसलें म्हणजे त्याचा मेंदूहि नीट रहात नाही, हा दररोजचा अनुभव आहे. पोटांत कळ उठली म्हणजे मस्तकहि ठणकूं लागतें. पोट व डोकें, पोट व हृदय यांचा संबंध अतिशय जिव्हाळ्याचा आहे–जवळजवळ अभेद्य. म्हणून सम्पन्नांच्या ‘ पोटाला चिमटा ’ घेतल्यावाचून त्याच्या अंत:करणाला पीळ पडणार नाहीं आणि डोकें ताळ्यावर येणार नाहीं असें निदान मजूरांच्या मजूर–पुढाऱ्यांनीं ठरविलें. **म्हणूनच गोविंद म्हणतो, “ संपन्नांचें हृदय शुद्ध करायचं असेल तर त्यांच्याच पोटाला चिमटा घ्यायाला हवा–तुमच्या (प्रकाशच्या) डोक्याला अन् पोटाला ताण देऊन कांहीं फायदा होणार नाहीं. ”**

‘ मालका ’ च्या पोटाला चिमटा घेण्याचेंहि एक तंत्र आणि शास्त्र बनलें. संप हें त्या तंत्रांतलें एक परिणामकारक हत्यार आहे. पण संपाची अत्यंत सवंग थट्टा अन्तू हा करतो, आणि त्या उपहासाला तो गोंडस व भ्रामक तत्त्वज्ञानाचें कोंदणहि लावतो. तो म्हणतो, ‘ मजूर हा आधीं नागरिक आहे आणि नंतर मजूर आहे. ’ पोट खपाटीला गेलेलें असऊें म्हणजे, कुलीनत्व आठवत नाहीं, नागरिकत्वाचें भान रहात नाहीं याचा त्याला अनुभव नाहीं.

प्रकाशला भूकेची आंच लागतांच सरकारी नोकरीचा मोह होतो. गोविंद बद्दलची त्याची सहानुभूति भुकेसमोर दुबळी ठरते. गोविंद सहजगत्या त्याला मोठा मार्मिक विरोध सुचवतो. तो म्हणतो, "खऱ्याचा प्रचार अन् खोट्याचा पगार यांचा मेळ घालणं तुम्हांला जमणार नाहीं एवढं लक्षांत ठेवा." आहारशुद्धि व 'सत्त्वशुद्धि' यांचा हा असा अन्योन्य संबंध आहे. "अन्नमयं हि सोम्य मनः". मजूर हा आधीं प्राणी आहे, अशनपिपासायुक्त जीव आहे, आणि नंतर तो सर्व कांहीं आहे हें अन्तू विसरतो. पण विपन्नावस्थेंत सांपडलेला प्रकाश विसरूं शकत नाहीं. मुबलक व चविष्ट आहार उपलब्ध असला म्हणजे भूक हें ईश्वरी वरदान ठरतें. पण माणूस अन्नाला मोताद झाला म्हणजे तीच भूक अभिशाप ठरते. जी भूक आरोग्याचें व तृप्तीचें सुख देतें तीच सर्व पापांचें मूळ होतें. **म्हणून मालकांच्या मालकीचा नायनाट करणें हा संपांना आळा घालण्याचा शास्त्रीय उपाय आहे.**

या नाटकांतील पराडकर हा आजच्या धनिकशाही युगाचा प्रतिनिधि आहे. भांडवलशाही व्यवस्थेचें आधारभूत तत्व हें कीं सारें जग म्हणजे एक मोठी बाजारपेठ आहे. त्या बाजारपेठेंत माणुसकीचाहि मीना बाजार भरतो. माणसाचें श्रम, शरीरबल, बुद्धिबल, विद्या, फार काय, शील देखील विक्रीकरितां मांडलेलें असतें. पुण्य, नीति, शास्त्र, कला, सारें कांही विकत मिळतें. माणसांच्या परस्पर व्यवहाराचें पायाभूत तत्त्व सौदा व सट्टा हें असतें. प्रेम, लग्न, शिक्षण इ. साऱ्या व्यवहारांना सौद्याचें तत्त्वज्ञान लागू असतें. जेथें 'वेळ म्हणजे पैसा' आहे तेथें जीवनाचें मोल देखील मोहरांत मापण्यांत येतें. एका निराळ्या अर्थानें साऱ्या मानवी जीवनाची 'सुवर्णतुला' करण्यांत येते. अशा या धनिकशाही युगाचा प्रतिनिधि पराडकर प्रकाशला 'व्यापारी कले'ची ( कमर्शल आर्ट ) दीक्षा देऊं इच्छितो हे स्वाभाविकच आहे. याच्या उलट गोविंदला दुकानदारीलाच दुनियादारी समजणाऱ्या जगाचा खडतर अनुभव आलेला असतो. तो प्रकाशला 'देशासाठीं उत्पादन' आणि 'नफ्यासाठीं उत्पादन' यांतील फरक समजावून सांगतो. पण कलावन्ताच्या काल्पनिक जगात नित्य व्यवहार करणाऱ्या प्रकाशला तो फरक पटवून घेत असतांना असह्य वेदना होतात. आपल्याला घेरी येईल कीं काय असें त्याला वाटतें. ज्या बाजारांत माणूसहि विक्रीकरतां मांडलेला जिन्नस बनतो त्यांतून माणुस-

कीच्या उद्धाराचा आणि जोपासनेचा एकच मार्ग आहे. संसाराला विश्वकुटुंबाचें स्वरूप प्राप्त व्हावें हाच एक तरणोपाय आहे. पंडिताची परिभाषा बोलणारा साम्यवादी म्हणेल, अवघा संसार म्हणजे 'कम्यून' बनला पाहिजे. आम्ही प्राकृत जन म्हणू अवघा संसार हें एक 'कुटुंब' बनलें पाहिजे.

प्रकाशची दृष्टि गरिबांच्या गरिबीत सौंदर्य पहाणारी परोक्षवादी कलावन्ताची दृष्टि आहे. तो आपल्या चित्रकलेसाठीं गोविंदला मुद्दाम कागदाचे गठ्ठे घेऊन एका ठराविक पद्धतीनें उभा रहायला सांगतो. डोक्यावर गठ्ठे घेतलेलें त्याचें शरीर प्रकाशला मोठें मोहक भासतें. लाकुडतोड्याच्या कपाळावरील घर्मबिन्दूहि ग्रि. रे. टिळकांना 'सुमनांच्या मेळ्या' सारखे सुंदर दिसत. परिश्रमात पावित्र्य आहे, उत्पादक परिश्रमांत कल्याणकारित्व आहे, श्रमजन्य वस्तूंच्या योगानेच जगांत सुबत्ता व सुभगता निर्माण होते म्हणून श्रम हीच संपत्ति आहे हें खरें. पण एकाला नाइलाजास्तव श्रम विकावा लागला आणि दुसऱ्याला आपल्या मर्जीप्रमाणें त्याचा बाजारभाव ठरविता आला तर तोच श्रम माणसाला दीन, हीन व अप्रतिष्ठित बनवितो. वस्तूनिर्माण करणारा व विश्व निर्माण करणारा यांच्यामध्यें असलेलें साम्य मनुष्याच्या लक्षांत फार प्राचीन काळींच आलें. मडकें तयार करणारा कुलाल आणि ब्रह्माण्ड घडविणारा ब्रह्मदेव हे एकाच जातीचे मानण्यांत आलें. पण विश्वविधात्याचा जो अधिकार तोच वस्तुविधात्यालाहि ज्या दिवशी प्राप्त होईल त्याच दिवशी परिश्रमांत प्रमादशक्ति उत्पन्न होईल. उत्पादक परिश्रमांत जर जगांत वैभव व मांगल्य निर्माण करण्याचा गुण असेल तर तो श्रम करण्यांत प्रतिष्ठितांनी व शिष्टांनींहि भूषण मानलें पाहिजें. 'शरीरश्रम' हें व्रत झालें पाहिजे. पण त्याला अपरिग्रहाची जोडदेखील मिळाली पाहिजे. एकानें राबावें, दुसऱ्यानें भोगावें, एकानें दळावें, दुसऱ्यानें खावें, अशी स्थिति जोंपर्यन्त राहील तोंपर्यन्त श्रमांत सौन्दर्यहि नाहीं आणि आनंद तर नाहीच नाहीं. **ज्या श्रमापासून अंगकांति, तुष्टि किंवा पुष्टि यांपैकीं कशाचाच लाभ होत नाहीं, ज्याची गणना व्यायामांतहि होत नाहीं व खेळांतहि होत नाहीं त्या श्रमाची पोकळ काव्यमय स्तुति कितीहि केली तरी तिच्यापासून आत्मप्रत्यय कसा उत्पन्न होणार ?**

कला ही निसर्गाच्या उपयुक्ततेंत व सौन्दर्यांत भर घालते. ज्यांत कला

असेल त्याला आपण मानवकृत, संस्कृत म्हणतो. गोविंद म्हणतो त्याप्रमाणें कष्ट व कला हीं भावंडें आहेत. कष्टांत उपयुक्ततेची व सौन्दर्याची भर पडली म्हणजे ती कलाकृति होते. म्हणून दुबळा दैववाद किंवा अडाणी आशावाद बाजूला सारून स्फूर्तीच्या आत्मप्रत्ययानें गोविंद म्हणतो, ' माझी उद्यां मी माझ्या हातानें घडवितों आहे. " केवळ उपकरणांनीं जीवनांत संगीत निर्माण होत नाही. सारंगीच्या तारा जुळवितां येण्याकरिताहि संगीताचीं केवळ भावना असावी लागते. ' रसिकता ' ती हीच. निदान स्वतःच्या उपभोगां-करतां, आपल्यापुरत्या नवीन भवनाची व भुवनाची उभारणी करण्याचीहि ज्याला पर्वा नाही तो हैवानच. त्याच्या निर्मितीत विपुलता व शीघ्रता असेल, पण कला नाहीं. आज तो निव्वळ नफेबाज आणि सांठेबाज असल्या-मुळेंच एकीकडे संस्कृतीच्या रक्षणाचा आव आणून दुसरीकडे 'जवानमर्द मोदका ' च्या किळसवाण्या जाहिराती प्रसिद्ध करण्यांत त्याला खंत वाटत नाहीं. हा विरोध या नाटकांतील बाबू मोठ्या मजेशीर रीतीनें दाखवतो. आज नफ्याच्या हपापानें पिसाळलेला मालक हैवान बनतो, आणि भाकरीचा ध्यास लागलेला मजूर नैवेद्य व प्रसादहि चोरून खातो. त्याला सभ्यतेची व नागरिकतेची जाणीवच रहात नाहीं. त्याला गुरांप्रमाणें प्राथमिक गरजा भागविण्याचीच विवंचना असते. नफेबाज हैवान जेव्हां मानव बनेल तेव्हांच इतर सारीं माणसेंहि गुराच्या स्थितीतून वर येतील.

परिस्थितीचा पगडा माणसाच्या वृत्तीवर नकळत कसा बसतो याचा मोठा गमतीदार अनुभव हे नाटक ऐकत असतांना आला. आमच्या खोलींत विजेचा पंखा चालू होता. शोभेनें अन्यमनस्कतेनें हातांत नोटा घेऊन अगदीं बेफिकीरीनें खुर्चीवर फेंकल्यासारख्या ठेवल्याचा प्रसंग नाना जोग वाचीत होते. मला क्षणभर वाटलें पंख्याच्या वाऱ्यानें नोटा उडून तर जाणार नाहींत ना ! दारिद्र्याच्या व दैन्याच्या स्पर्शानें माणसाच्या प्राणशक्तीचा प्रसन्न झराच गोठून जातो. व्यायामानें शरीराला कांति व पुष्टि लाभते, चर्येवर टवटवी येते, पण नाइलाजाच्या कष्टानें मन विटतें, शरीरहि खंगतें. नाइलाजाच्या कष्टांत वृत्ति रंगत नाहीं, जीव उबगतो, कामचोरपणा, कुच-राई करण्याची वृत्ति वळावते. मन कंटाळलें आणि त्रासलें म्हणजे स्वभावांत तुसडेपणा, चिडखोरपणा येतो, साऱ्या जगाचा राग येतो. परिस्थितींत पालट

घडवून आणण्याचें सामर्थ्य नसलें म्हणजे माणूस अवजारांवरच राग काढूं लागतो. या नाटकांतील खांसाहेब सारंगीवर रागावूग ती फोडून टाकतात. आपल्याच बोटांवर रागावून त्यांचा कडकडून चावा घेतात. कित्येक साधक आपल्या इंद्रियांवर रागावून हातच कापून घेत, डोळेच फाडून टाकत. थोडीशी प्रतिकारशक्ति असेल तर उपकरणांचीच हत्यारें बनतात. वर्दळीला किवा जिकिरीला आलेली आई लाटण्याचा किंवा झाऱ्याचा उपयोग शस्त्रासारखा करील. हातोडा–कोयता हें श्रमसत्तेचें प्रतीक मानणाऱ्या एका चिडलेल्या वहाद्दरानें तोच हातोडा ट्रॉट्स्कीच्या डोक्यांत हाणला. वस्तूचा किंवा उपकरणांचा विध्वंस विकारवश होऊन मनुष्य करीत असतो. पण कुठलाहि क्रांतिवादी याचें समर्थन करीत नाहीं. परदेशी कापडाची होळी आपण हिंदुस्थानांत केली, पण तिच्यांत विकार नव्हता. तिच्यांत एक तत्त्व होतें. माणसावरील राग जर माणसाऐवजी वस्तूवर काढला–दुबळेपणामुळें नव्हे तर विचारपूर्वक व विवेकबुद्धीने–तर माणसामाणसातील वैरभाव कमी होईल या हेतूनें ती होळी करण्यात आली होती. वस्तूचा नाश त्या वस्तूविषयीं अरुचि उत्पन्न करण्यासाठीं होतो, पण खरा अपराध माणसाचाच असतो. म्हणून दुसऱ्या एका दृष्टीनें माणसावरील राग उपकरणांवर काढणें अशास्त्रीयहि ठरतें.

वृत्ति परिवर्तनाकरितां वस्तु परिवर्तनाची आवश्यकता आहे हें निर्विवाद आहे. वस्तुस्थिति बदलली कीं वर्तन बदललेंच, आणि वर्तनांतूनच वृत्ति बनते. या सिद्धान्ताला ‘ वस्त्वनुवर्तनवाद ’ किंवा ‘ बिहेविअरिझम ’ म्हणतात. हें वस्तुपरिवर्तन घडवून आणण्याकरितां विद्यमान वस्तुस्थितीचा प्रतिकार करावा लागतो. विद्यमान वस्तुस्थितीचे संरक्षक व कैवारी जे असतील त्यांचाहि प्रतिकार करावा लागतो. साधनहीन, संपत्तिहीन, विद्याहीन वर्गातील असंस्कृतपणा, निगरगट्टपणा किंवा बत्थडपणा औपाधिक असतो; तो त्याचा स्वभावगुण नव्हे. त्याचप्रमाणें श्रीमंताची हृदयहीनताहि औपाधिक आहे. तो उपाधि म्हणजे वर्ग. वर्गनिष्ठ नीतिमत्ता वर्गभेदाचाच परिणाम आहे. म्हणून वर्गभेदनिराकरणावांचून गत्यंतर नाहीं. वर्गभेद निराकरणाची प्रक्रिया व साधनें कोणचीं असावीत या बाबतींत मतभेद असणें निराळें. रोगाच्या चिकित्सेच्या जशा दोन पद्धती आहेत, तशाच अन्यायाच्या चिकित्सेच्याहि

आहेत. सडलेला अवयव नाइलाजास्तव तोडावाच लागतो हा एक प्रकार. सडलेला अवयव तोडण्याची पाळी न येऊं देतां तो दुरुस्त करतां येण्यासारख्या उपचारांचा प्रयोग करावा ही दुसरी पद्धति. एक म्हणतो, दुष्टाचा संहार केल्यावांचून दुष्टावा नाहींसा होणार नाहीं. दुसरा म्हणतो, दुष्टावा नाहींसा करण्याची युक्ति शोधा, म्हणजे ' दुष्ट ' उरणारच नाहीं.

धार्मिक तत्त्वज्ञ, परोक्षवादी म्हणाला, संसाराचाच त्याग करून अरण्य-सेवन कर म्हणजे सारे प्रश्न सुटतील; कांहीं प्रश्न सोडविण्याकरितां सोडूनच द्यावे लागतात. शुद्ध कलावादी म्हणतो, आपली निराळी मनोमय गंधर्वनगरी निर्माण करा म्हणजे सुख लाभेल. नीतिवादी सन्त म्हणाला, अपराधांची क्षमा कर, अपकार सहन कर, वाईटाचा प्रतिकार करूं नकोस. हे सारे सिद्धान्त अपुरे, अशास्त्रीय व निष्फळ आहेत. गरिबाची गरीबी ही मानवनिर्मित असल्यामुळें ती नाहीशी करतां येते; गरिबांनीं सम्पन्नांची मर्जी संपादन करून त्यांच्या मेहेरबानीवर जगण्याचें कारण नाही; किंबहुना **एकाच्या कृपेवर किंवा भरंवशावर दुसरा जगूं लागला तर दोघांचाहि अधः-पात होतो; म्हणून ' भीक ', ' चोरी ', आणि ' दान ' या तिन्ही संस्था नाहींशा झाल्या पाहिजेत;** असा आशादायी व क्रांतिकारक सन्देश युगप्रवर्तक, क्रांतिदर्शी, नवीन अर्थशास्त्राचा द्रष्टा, मानवतेचा पैगंबर कार्ल मार्क्स यानें दिला. **मार्क्सच्या पूर्वीचें ' अर्थशास्त्र ' हें ' स्वार्थ-शास्त्र ' होतें. जुन्या ' स्वार्थशास्त्रा ऐवजीं नवीन ' अर्थशास्त्रा ' चें निरूपण व प्रतिपादन मार्क्सनें केलें. म्हणून क्रान्तीच्या क्षेत्रांत महर्षि कार्ल मार्क्स हा मानव्याचा पहिला पैगम्बर आहे.**

फक्त त्वेष, प्रकोप आणि वर्गभावना जागृत करणें म्हणजे समाजवाद किंवा साम्यवाद नव्हे. वर्गभेदनिराकरणाची विशिष्ट पद्धति व प्रक्रिया निश्चित करणें, हें शास्त्रीय क्रांतितंत्राचें वैशिष्ठ्य आहे. त्या प्रक्रियेचें सूचक दिग्दर्शन या नाटयकृतींत आहे. आज विज्ञान व नीति, शास्त्र व कला, बुद्धि-निष्ठा व भावनात्मकता यांच्यांत भेद व क्वचित विरोध दिसून येतो. या भेद-विरोधांचा परिहार करून त्यांचा अविरोध साधणें क्रांतिप्रवर्तकांचें एक महत्त्वाचें कार्य आहे. आर्थिक विषमता ही अपरिहार्य व अनिराकरणीय

आहे या समजुतीमुळें पूर्वी अर्थवंचित लोकांना अथसपन्नाच्या उदात्त भावनं-वर विसंबून जगावें लागे. **आर्थिक विषमतेचें शास्त्र कठोर दृष्टीनें विश्लेषण करून वर्गभेद निराकरणाच्या प्रक्रियेचें प्रतिपादन मार्क्सनें केलें.**

मार्क्सनें दलित व वंचित मानवाला आशेचा, आत्मविश्वासाचा संदेश देऊन जीवदान दिलें. गांधींनीं एक पाऊल पुढें टाकून मानवसत्तेच्या संस्थापनेचें मानवोचित साधन व तंत्र सांगितलें. म्हणून त्यांना मानवतेचे आधुनिकतम आणि म्हणून अद्यतन पैगंबर म्हणावें लागेल. वस्तुपराङ्मुख न होतां वस्तुपरिवर्तनाचा संकल्प करणें, कल्पनेच्या गंधर्वनगरींत गुग न होतां या जगाचेंच नन्दनवन बनविण्याचा उद्योग करणें, अन्याय, अत्याचार व अपकार सहन करण्याऐवजीं अन्यायी, अत्याचारी व अपकारी यांची सेवा करण्याकरितां अन्याय, अत्याचार व अपकार यांचा आमरण प्रतिकार करणें, या अपूर्व तंत्राचा शोध व प्रयोग ज्या सत्याग्रहाच्या प्रणेत्यानें व प्रवर्तकानें केला त्यानें मानवाला मानवतेचा सन्देश दिला. धनिकशाही युगांतील ' दुकाना ' चें ' मकान ' बनवितांना मकानांत राहाणारा ' माणूस ' शिल्लक ठेवण्याची काळजी घेतली पाहिजे; दुष्टतेचें निराकरण दुष्टांच्या उद्धाराकरितां आहे; गरिबीचें निराकरण गरिबांच्या उन्नतीकरितां आहे; श्रीमंतीचें निराकरण श्रीमंताच्या उद्धाराकरितां आहे; आजाराचें निराकरण आजाऱ्याला जगविण्यासाठीं आहे; गुन्ह्याचा प्रतिकार गुन्हेगाराला वाचविण्याकरितां आहे; अन्यायाचें, पापाचें निराकरण अिष्ट आहे; अन्यायी माणसाचा, पाप्याचा अन्त करण्याचा हेतु असणें अनिष्ट आहे. संपन्न आणि विपन्न या दोन्ही वर्गातील व्यक्तींमध्यें मूलभूत माणुसकीचें तत्त्व सामान्य आहे. नित्य घाणींत रहाणाऱ्या व घाणींनच वावरणाऱ्या भंगिणीचें गोंडस मूल खराट्याशेजारीं सुखानें झोंपूंहि शकतें, यांत जशी माणसाची प्राणिसुलभ अदम्य जिजीविषा शेवटीं बलवान् ठरते, त्याचप्रमाणें वर्गभेद-निराकरणाच्या प्रक्रियेंतहि त्याची सहृदयता व बन्धुभाव दुरतिक्रम आणि प्रबळ ठरला पाहिजे. **प्रतिकाराचेंहि तंत्रदेखील बन्धुत्वाच्या उत्कर्षाला पोषक असलें पाहिजे. या प्रयत्नांतूनच गांधींच्या अहिंसक प्रतिकाराच्या प्रक्रियेचा जन्म झाला.**

**पण प्रतिकाराचें तंत्र अहिंसात्मक असो कीं अहिंसानिरपेक्ष असो, वर्गभेद निराकरण हेंच त्याचें साध्य असलें पाहिजे. मालक-मजूर हा भेद जोंपर्यंत कायम राहील तोंपर्यंत संप अपरिहार्य आहेत.** त्यांची मर्यादा मात्र राखली पाहिजे. केवळ अडवणुकीकरितां किंवा वैतागामुळें संप पुकारणें उभयपक्षीं अहितकारक होईल. संप हें हत्यार आहे. हत्यार कांहीं खेळणें नव्हे. पोराच्या हातीं कुऱ्हाड दिली तर तें दिसेल त्या झाडावर तो चालवून पहातें. कुऱ्हाडीच्या अशा अविवेकी 'प्रयोगा' नें सर्वत्र खेळखंडोबा होईल संपाच्या हत्याराचाहि अविवेकी व अमर्यादित प्रयोग झाल्यास अनवस्था माजेल. वर्गभेद निराकरणाच्या कामीं श्रीमंतानींहि गरिबांशीं सहकार्य करावें यातच उभयतांचें कल्याण आहे. श्रीमंतांनी सहकार्य करणें म्हणजे स्वतःच्या श्रीमंतीच्या विनाशाला हातभार लावणें. असें झालें तर वर्गनिराकरण गोडीगुलाबीनें व सामोपचारानें होईल. एरव्ही लढा अपरिहार्य आहे. त्यांत विषाद किंवा खंत वाटू देण्याचें कारण नाही. संपाचा निषेध करणाऱ्या या नाटकांतील अन्तूचा युक्तिवाद जितका भ्रामक आहे तितकाच संपाचें खुबीनें समर्थन करणाऱ्या गोविंदचा युक्तिवाद आपातरमणीय आहे. हिंसेच्या प्रयोगावांचून, माणसांच्या जिवाला इजा न करतां, लढा करण्याची हातोटी किंवा युक्ति हें क्रान्तियोगातील 'कौशल्य' आहे. त्यात असहकारितां, संप, सत्याग्रह इ. साधनाचा समावेश होतो. **वर्गसमन्वय अशक्य आहे, अशास्त्रीय आहे. वर्ग निराकरण आवश्यक आहे. तें सामोपचारानें झालें तर उत्तमच. एरव्ही अहिंसेच्या व सभ्यतेच्या मर्यादा संभाळून निकराचा लढा करणें आवश्यकच नव्हे तर इष्टहि आहे.**

या नाटकांतील बळी महाराच्या बायकोवर संपाच्या धामधुमींत एका गुंडानें हात टाकलेला असतो. त्याची चीड येऊन बळी त्या गुंडाला बेदम मार देतो व फरारी होतो. त्याला शिताफीनें मदत करणाऱ्या शोभेची लबाडी, तिचें असत्याचरण, पावित्र्यवादी माणसालाहि क्षम्य समर्थनीयच नव्हे तर उदात्त व गोडहि वाटेल. यातील मर्म ओळखलें पाहिजे. भांडवलदारी समाजव्यवस्था हेंच एक प्रचंड असत्य आहे, एक जगड्व्याळ स्तेय आहे, केन्द्रीभूत हिंसा आहे. तिचा प्रतिकार सत्यानें, अस्तेयानें व

अहिंसेनें करतां येतो हें तर्कानें व प्रयोगानें पटवून देण्याचें सामर्थ्य ज्यांना असेल, भविष्यकाल त्यांचा आहे. मग शोभेचें असत्याचरण मनोरम वाटणार नाही. केवळ निषेधानें किंवा उपेक्षेने यापुढें भागणार नाहीं. विधायक प्रतिभेची व पराक्रमाची आवश्यकता आहे. कोंबडा झांकून ठेवल्यानें दिवस उगवण्याचे टळणार नाहीं. या नाटकांतील बाबूनें 'शेपटीं कायद्या' विषयीं ( पब्लिक सेफ्टी अॅक्ट ) ज म्हटलें आहे त्यांतील अर्थ मार्मिक व लक्षांत घेण्यासारखा आहे. समाजांत जोपर्यंत एकीकडे संग्रहाची प्रतिष्ठा आहे, तोंपर्यंत दान, भीक व चोरी या संस्था रहाणारच. ज्या समाजांत दान, भीक व चोरी या संस्था राहणारच नाहीत त्याच्या व्यवहारांत असत्य व हिंसा यांना फारसा अवकाशच रहाणार नाही. अर्थव्यवस्था बदलल्यानंतर लोकांच्या नैतिक व सांस्कृतिक जीवनांत आपोआपच परिवर्तन होईल. 'शेपटी कायद्या' नें काम भागणार नाही, या बाबूच्या म्हणण्यांत बरेंच तथ्य आहे. अर्थक्रांतीची प्रभावशाली अहिंसक प्रक्रिया व तिच्या पद्धतशीर प्रयोगाची कला विकसित करणें हा एकच तोडगा यावर आहे. अन्तू सेवाधर्मावर आधारलेल्या क्रांतीची भाषा बोलतो. पण प्रतिकाराचाहि समावेश सेवेंत झाल्याखेरीज केवळ विधायक सेवाधर्मानें क्रांति होण्याची आशा नाही. सेवाधर्मानें घडवून आणलेल्या क्रांतीने जी समाजव्यवस्था प्रस्थापित होईल तिच्यांत उत्पादनहि सेवेकरितांच झालें पाहिजे. **'भोगाकरितां उत्पादन' हें स्वार्थशास्त्राचें सूत्र आहे. 'सेवे करितां उत्पादन' हें सर्वार्थ शास्त्राचें तत्त्व आहे. या नाटकांतील गोविंद यालाच 'नफ्याकरितां उत्पादन' विरुद्ध 'देशाकरितां उत्पादन' म्हणतो. सेवेकरितां उत्पादन म्हणजे एकमेकांकरितां उत्पादन, म्हणजेच सर्वांकरितां उत्पादन. तसें झालें म्हणजे वर्गभेद संपलाच.**

पण हें नाटक वर्गभेदनिराकरणावरील किंवा प्रतिकारशास्त्रावरील प्रबन्ध नव्हे. या नाटकांतील मध्यवर्ति व मुख्य प्रतिपाद्य प्रमेय नाटककारानें 'शोभे' कडून वदविलें आहे, आणि मोठ्या कौशल्यानें व कलायुक्त पद्धतीनें वदविलें आहे. जो मृत्यूला भ्याला तो नित्य नवजीवनाच्या प्रसादाला मुकला. ज्याला अमरत्वाचे डोहाळे लागले असतील त्यानें 'आपुल्या मरणा' चा अनुपम

सोहळा पहाण्याची तयारी ठेवलीच पाहिजे. म्हणजे तो मरणोन्मुख असला पाहिजे असें मात्र नाही. अमरत्त्वाच्या सिद्धीसाठी मृत्यूला जिंकण्याची एकच युक्ति आहे, आणि ती म्हणजे नवीन जीवनाच्या विकासाकरितां आत्म-विसर्जनाला तयार राहणें. प्रत्येक मातेला याचा प्रत्यय व अनुभव असतो. प्रसूतिवेदना सहन करायला जी तयार नसेल तिला मातृत्वाच्या रूपानें नव-जन्माचा आनंद लाभणार नाही. प्रसूतिवेदनातूनच 'संतति' – जीवनाचें सातत्य निष्पन्न होतें. प्रसूतीत अनेकदा स्वतःचे प्राण देऊनहि नवीन प्राण्याला जन्म द्यावा लागतो ग्रीक दंतकथेतील फिनिक्स पक्ष्याविषयीं अशी जनश्रुति आहे कीं त्याने स्वत.च्या चिताभस्मांतून पुनर्जन्म घेतला. जेथें स्वतःच्या चितेंतून पुनर्जीवित होण्याची शक्ति आहे तेथें मृत्यु नाहीच. अखंड जिजीविषा–अमरत्त्वाची अदम्य आकांक्षा–हा जीवाचा व समाजाचा स्वभाव आहे. स्मशानवासी प्रलयकर रुद्रच शुभंकर शिवशंकरहि आहे. याप्रमाणें मृत्यूला जीवनाचें अस्तर आहे. नवीन जीवाला जन्म देतांना मातेचा प्राण न गेला तरी तिचा पुनर्जन्म होतोच. समाजातील स्थित्यंतराच्या बाबतींतहि कांहीसें असेंच होते.

मार्क्सवाद्यांचें एक स्वतंत्र समाजविज्ञान आहे. पण त्यांतहि मृत्युनिष्ठा नाहीं ; मृत्यूच्या द्वारें जीवनसिद्धि व जीवनाचें सातत्य आहे. वस्त्वनुवर्तन-वादांत –– बिहेवियरिझम्‌मध्ये — ज्याप्रमाणें पुष्कळच तथ्यांश आहे, त्याच-प्रमाणें या 'मृत्युद्वारे जीवना'च्या सिद्धान्तातहि बरेच तथ्य आहे. 'शोभे'नें त्याच तत्त्वज्ञानाचें किंचित सूचक व कलात्मक भाषेत विवरण केलें आहे. अर्थातच दृष्टान्त म्हटला की तो एकदेशीय असणारच. दृष्टान्त म्हणजे युक्ति किंवा मुद्दा नव्हे. 'शोभे'ला नवजन्माचे डोहाळे लागलेले असून नवजीवनाच्या आकांक्षेत तिला मृत्यूची तमा वाटत नाही, हा त्यांतला मुद्दा. तो जोगांनीं तिच्या तोंडीं घातला आहे. थोडक्यांत त्यांचा आशय असा आहे:–

**ज्या माणसाची दृष्टि अद्यतन ज्ञानाच्या मर्यादा ओलांडून पलीकडे पहायला सरसावते त्याच्या पंचप्राणांना बेसुमार ताण हा पडणारच. एक डोळा स्वतःच्या प्राणावर ठेवून दुसऱ्या डोळ्यानें मर्यादित सृष्टीपलीकडे पहाण्याचा घाट घालणाराचें क्षितिज फारसें विशाल राहूंच शकत नाहीं. ज्याची तयारी प्राण पणाला**

**लावण्यापर्यंत जाऊं शकेल त्याच्याच प्रतिभेला नव्या जगाचा साक्षात्कार होऊं शकेल—त्याचेंच ज्ञान प्रचलित मर्यादांच्या पलीकडे जाईल. ज्याला नवें जग 'परवडत'नसेल त्यानें त्याची आकांक्षाहि धरूं नये. नव्या जगावर थिल्लर प्रेम करणाऱ्या माणसालाहि निसर्ग नियमाप्रमाणें नव्या जगाच्या वाढत्या संसाराचा 'नको तो' परिणाम पहाण्याचा प्रसंग टाळतां येणार नाहीं. "गरिबीमुळं पोट पाठीला जरी चिकटलं तरी त्या अडचणींतसुद्धां त्या लहानशा 'परिणामा'ला आपला वाढता संसार थाटण्यापुरती जागा सहज सांपडते" असें 'शोभे'चें म्हणणें आहे. राम व कृष्ण या युग-प्रवर्तकांच्या भावी कार्याचे डोहाळे कौसल्या व देवकी यांस होऊं लागल्याचें वर्णन आपल्या पुराणांत आहे. जोगांच्या 'शोभे'लाहि, त्यांच्या तत्त्वज्ञानाला अनुसरून, येऊं घातलेल्या नवीन युगाचे डोहाळे होत आहेत.** म्हणूनच ती आपल्या 'पोटच्या गोळ्या'चे स्वागत खालील शब्दांत करते.—

'ऐक ! ऐक हा हुकार—पोटच्या गोळ्याचा—एका तिळभर जीवाचा—जो कितीहि दुबळा असला आज—ज्याला नाही आज ज्ञान, समाधान, सौंदर्य—अन् चोहींकडून कोंडला असला—तरी ज्यास भरवीन घास, एकेक सावकाश, माझ्याच रक्तांमांसाचा-अन् मग जो फुटताच प्राण, शब्द, पंख—मोडून सावली माउलीची, मोडून छत्र तिचंच, करून निशाण, सुटतो जसा बाण, एका क्षणी, एका क्षणात—तसा होईल स्वतंत्र !—पहा हा मोहळा, हा सुग्सोहळा आपल्या मरणाचा—मरून जगण्याचं हें जीवनतंत्र ! — पहा ! '

अविच्छिन्न प्रजातन्तूच्या रूपाने किंवा कर्माच्या रूपानें वैयक्तिक व सामाजिक जीवनाचा प्रवाह अखण्ड व अनन्त राहतो, अशा अमरत्वाच्या अनेक उपपत्ती प्राचीन व अर्वाचीन मीमांसकांनी मांडलेल्या आढळतात. मार्क्सच्या द्वंद्वात्मक भौतिकवादाच्या उपपत्तीचें निरूपण शोभेच्या उद्गारात आहे. या सर्व उपपत्तीची सत्यता भौतिकशास्त्रांचा विकासच ठरवील. **पण ज्याला नचिकेताप्रमाणें अमरत्त्वाचा ध्यास लागला असेल**

**त्याला यमराजाच्या आतिथ्याचा स्वीकार करण्याची हिंमत राखावी लागेल हें प्रमेय निर्विवाद आहे.**

मला नाटयशास्त्र, नाटयवस्तु, कथानक, स्वभावचित्रण, रसपरिपोष इ. विषयांचे कांहीच कळत नाहीं. म्हणून मी या प्रस्तावनेंत 'सर्वार्थसाधनभूत मौना' चाच आश्रय करून त्या बाबतींत 'झाकली मूठ' ठेवली आहे. तरी-पण जुन्या नाटकांत व या नाटकात एक सहज लक्षांत येण्यासारखा फरक आहे. यात कुठलाहि रस उत्कट किवा तीव्र स्वरूपांत नाही. माणूस ढळढळा रडेल, खदखदा हंसेल किवा त्याच्या अंगरख्याचे बंद तटतटा तुटतील असे प्रसंग त्यांत नाहीत. तरीपण अंतःकरणाला चटका लावणारे, बुद्धीला गति देणारे, मनाला डिवचणारे हृदयंगम प्रसंग त्यांत अनेक आहेत. शेवटला भाग तर कलेच्या दृष्टीने उत्कृष्ट उतरला आहे. कळायला किंचित् कठिण वाटेल, पण मोठा गंभीर, उदात्त व रमणीय आहे.

नाटकाच्या भाषेचें वळण, लकब व थाट थेट नागपुरी आहे. ग्रामीण भाषाहि या प्रांतांतील आहे. तिच्यांत एक प्रकारची खुमारी आहे.

एकंदरींत मला हें नाटक अतिशय आवडलें. पण तें 'आवडणें' हें आजच्या जगात प्रतिष्ठितपणाचें द्योतक आहे कीं नाही हें मला माहीत नाहीं. त्यामुळे अमुक एक गोष्ट मला आवडते म्हणण्याचीहि भीति वाटते. पण तें बन्दिस्त असो वा नसो, हें नाटक मला आवडलें याला माझा इलाज नाहीं. म्हणूनच मी त्याला प्रस्तावना लिहिण्याचें कबूल केलें. वाचकांना व नाटककाराला तिचा उपयोग झाला तर मला धन्यता वाटेल; न झाला तर त्यांत दोष मला प्रस्तावना लिहायला लावणाऱ्या जोगांचा आहे.

नागपूर
ता. ८ ऑगस्ट १९४८

**दादा धर्माधिकारी.**

# नाटकांतील पात्रें



१) **प्रकाश वनमाली**—चित्रकार व चित्रशाळेचा चालक
२) **शोभा**—त्याची पत्नी
३) **खांसाहेब**—तिचे गायन शिक्षक
४) **अन्तू**—वनमाल्यांचा मित्र; 'ज्ञानदीप' चा संपादक
५) **पराडकर**—रेनबो लिथो वर्क्सचा मॅनेजर
६) **गोविंद**—मध्यमवर्गीय 'कामगार'
७) **बळी**—महार कामगार
८) **बाबू**—कंपॉझिटर
९) **जंगलू**—सटरफटर कामें करणारा प्रेस कामगार
१०) **विद्या भागवत**—'चित्रशाळें'तील विद्यार्थिनी
११) **पोलिस इन्स्पेक्टर**
१२) **पोलिस कॉन्स्टेबल**



# अंक पहिला

(पोर्ट्रेट–आर्टिस्टचा स्टूडियो. मागील भिंतीची डावीकडील अर्धी बाजू उत्तरेकडील उजेडा ' साठीं ग्राऊंड–ग्लासनीं बंद केली आहे. त्याच भागावरील अर्धे छतहि ग्राऊंड–ग्लासचेंच आहे. भिंतीच्या उजव्या कोपऱ्यांत सहा दगडी पायऱ्या, नंतर लँडिंग, तिथून डाव्या बाजूला लाकडी जिन्याच्या पायऱ्या, शेवटी वरच्या मजल्यावरील एका खोलीचा दरवाजा. जिन्याला व वरच्या दरवाज्यासमोरील लँडिगला कठडा आहे. दगडी पायऱ्यांच्या लँडिंगपासून उजवीकडेहि वर जाण्यासाठीं पायऱ्या आहेत असें दिसतें. वरच्या मजल्याच्या दरवाज्याच्या बरोबर खालीं एक दरवाजा आहे. हा दरवाजा मागील 'खाजगी' खोलीचा आहे. उजव्या विंगला एक दरवाजा आहे. तो बाहेरून येण्याचा दरवाजा आहे. डाव्या विंगला दोन दरवाजे आहेत. पलीकडच्या दरवाज्यावर 'विद्यार्थि' असा तक्ता लागला आहे. अलीकडील दरवाज्यावर 'स्टोअर्स' असा तक्ता आहे.

स्टुडियोच्या भिंतीवर निरनिराळ्या आकारांचीं व निरनिराळ्या श्रेणीच्या विद्यार्थ्यांनीं, तशींच प्रकाशनेंहि काढलेली चित्रें आहेत. लाकडी जिन्याखाली एक टेबल आहे. त्यावर फोटोफ्रेम आहे. फोटो प्रकाश व शोभा यांचा एकत्र उभे असल्याचा आहे. टेबलावर पानदान आहे, तशींच चारदोन पुस्तकेंहि डाव्या विंगच्या मागील कोपऱ्यांत गांधीजींचा अर्धपुतळा आहे. याशिवाय इतस्ततः स्टुलें, खुर्च्या, वगैरे फर्निचर आहे. मध्येंच एक सोफा आपल्याकडे तोंड करून ठेवला आहे.

वेळ सकाळच्या आठसाडेआठची असल्यामुळें स्टुडियोमधील कोणताहि

दिवा जळत नसतो. मागील ग्राउंड ग्लासच्या भिंतीपासून थोड्या अंतरावर, उजव्या विंगकडे तोंड करून ईझलसमोर उभा असलेला प्रकाश कसलें तरी चित्र काढण्यांत गुंगला आहे हें पडदा बाजूला होतांच आपल्या ध्यानांत येतें. प्रकाशचें वय २७–२८. त्याच्या अंगांत अॅप्रन आहे. तोंडांत पाईप, उजव्या हातांत ब्रश, डाव्या हातांत पॅलेट. मधेंच पाईप व ब्रश ठेवून तो उजव्या बाजूला असलेल्या स्टुलावरील चहाचा कप उचलतो, गाणें गुणगुणतो, मागे सरकून चित्राकडे दुरून बारकाईनें पाहतो. चहाचा एक घोट घेतो, चित्राजवळ येतो, कप खाली ठेवतो, ब्रशचे एकदोन फराटे मारतो, पुन्हा चहाचा कप उचलून मागे जातो व पुन्हा बारकाईनें चित्राकडे पहात गाणें गुणगुणत उभा असतो. इतक्यांत कॉलबेल वाजते, प्रकाश दरवाज्याकडे चटकन् पाहतो, पण पाहुण्यांना चहा देण्याचा प्रसंग टाळण्याच्या हेतूनें कपांतला चहा एकदम गट्ट करून, कप ट्रेमध्ये ठेवून तें उचलतो व खाजगी दरवाज्याकडे वळतांना ' यम् ' असा लांब हेल काढून बेलला जबाब देऊन घरात शिरतो. पुन्हा कॉलबेल वाजते, व बाहेरून म्हाताऱ्या माणसाची हांक येते " आहांत काय साहेब घरी ? " )

**प्रकाश**–( बाहेर येतां येता ) कोण आहे ? ( दरवाजा उघडतो) कोण खांसाहेब ! या, या, या !

( खांसाहेब प्रवेश करतात. खांसाहेबांच्या अंगांत मलमलीचा मळकट पंजाबी, पायांत त्याच कपड्याचा चुस्त पैजामा, जुनाट असा पंजाबी जोडा, डोक्याला कुरतडलेली काळ्या फरची टोपी. त्यांच्या बगलेत गवसणी असलेली सारंगी आहे. डोळ्याला जाड लेन्सचा चष्मा आहे. त्यांचें वय ५५ ते ६० )

**खां सा.**–काय साहेब, थोड्या अरस्यासाठीं बुढ्या मानसाची ओळखी विसरत चालले ! (बसण्यासाठीं इकडेतिकडे पाहून जागा ठरवीत असतात. )

**प्रकाश**–( त्यांच्या बगलेंतील सारंगी काढून घेऊन, एक खुर्ची त्यांच्या पुढें करून ) ओळख विसरायला काय झालं खांसाहेब ! बसा, बसा; खरं म्हणजे आम्हीच तुमची एकसारखी आठवण करीत असतों – बाबासाहेबांचा दमा अलीकडे फार त्रास द्यायला लागला आहे त्यांना, पण थोडं बरं वाटलं कीं त्यांना तुमची आठवण होते – हं, कसं काय ?

**खां सा.**–अजी त तुमच्या शाळेतल्या एखाद्या पोऱ्याला माझ्याकडे पाठवलं राहतं त मी आलो राहतो नाही ?

**प्रकाश**–पण तुम्हालासुद्धां आतां म्हातारपणीं तकलीप द्यायचं ! [जीवावर नाही का येत आमच्या ]

**खां सा.**–( खिशातलें विडीचें बंडल काढून त्यांतली चांगलीशी विडी निवडीत ) तुम्हा जवान लोकाहिचं शहानेपन आहे – ! (विडी तोंडात घालतांना इकडे तिकडे पहात थोडचा सलगीच्या अधिकारात ) कुठं आहेत शोभाबाई ? – थोडा चहा – ( काडी पेट्वतात )

**प्रकाश**–अलबत् ! शोभा ! ए शोभे !

**शोभा**–(खाजगी दरवाज्यांतून डोकावून) कोण खांसाहेब ! किती दिवसांनीं आलांत ! ( तिचे हात ओले असल्यामुळें कोपरानें पडदा बाजूला सारून बाहेर येते. खासाहेबांना सलाम करून पदराला हात पुसते. शोभाचें वय २५।२६. बांधा उंच, प्रकृति उत्तम, डोळे पाणीदार, चालणें ताठ, बोलणें खणखणीत. केस फारसे नीटनेटके नाहीत. तिची साडी घरकामांत वापरायची. ) बाबाना कित्ती आठवण येते तुमची !

(खूप आनंद झाल्यासारखी त्याच्याजवळ येऊन उभी होते)

**प्रकाश**–शोभा ! खांसाहेबांसाठीं चहा कर बरं आधी.

**शोभा**–( तत्परतेनें मागे परतून ) एकदम ! आत्ता आणते हं, एका मिनिटांत – वरणासाठी आधण ठेवलेलं आहे – तेंच आणते किटलीत टाकून.

**प्रकाश**–(ती घरात शिरते आहे असें पाहून हळूच, चोरटयासारखा) अन् एक कप माझ्यासाठीं बरं का !

**शोभा**–( पडद्यातून परतून ) म्हटलं आज उठल्यापासून दोन तासांत तीन कप चहा झाला आहे बरं का ! ( अदृश्य होते )

**खां सा.**–( थोडी सलगीची थट्टा करीत ) काय साहेब ! जबाब जरा कडवा आला ! साखर महंगी झालो दिसते थोडी! ( हंसतात – हंसतां हंसतां विडीच्या धुराचा थोडा खोकला येतो. )

**प्रकाश**–( खांसाहेबांच्या कोटीवर खुष झाला असला तरी थोडे आत्मसमर्थन करीत ) छे, छे ! तसं कांहीं नाही! पण आज चहा जास्त व्हायला

थोडं कारण झालं;–काय झालं – आज सकाळीं उठल्याबरोबर वरच्या गॅलरींतून सडकेकडे पहात उभा होतों मी सहज – तर समोरच्या पानवाल्याच्या दुकानापासून थोड्या अंतरावर उभी असलेली एक भंगीण दिसली मला. तिच्या डोक्यावरच्या टोपल्यांत तिनं आपला खराटा अन् त्याच्याच शेजारीं वर्ष सवा वर्षाचं आपलं मूल ठेवलं होतं; अन् दुकानासमोरच्या गलक्यापेक्षांहि मोठा आवाज काढून ती म्हणत होती, " थोडा चूना देव ना लछमनराव ! " ( तिची नक्कल करतो ) तिचें पोर त्या खराट्याशीं खेळत इकडेतिकडे चौकस नजरेनं पहात आपल्या मनाशीं मोठमोठ्यानं 'बा ! ' 'ता ! ' करीत होतं. त्या पोराचे डोळे मोठे पाणीदार होते. मी मनाशीं म्हटलं इनसानियतची ही ठिणगी – ठिणगी म्हणजे समजलांत ना ?

**खां सा०**–हां हां, चिनगारी–

**प्रकाश**–इनसानियतची ही चिनगारी आजच्या दुनियेच्या दबावाखालीं दबून खाक होऊन जाईल ! पण तेंच पोर मौका मिळाला तर एखादा गवई होऊं शकेल, कवि होऊं शकेल, एखादा चित्रकार होऊं शकेल ! अजून त्या पोराची मूर्ति माझ्या डोळ्यांपुढें उभी आहे. ती पाहिली तेव्हां मी मनाशीं ठरविलं कीं माझ्या मनांतल्या मनांत ती ठिणगी विझून जाण्यापूर्वीं तिचं तेज रंगवलं पाहिजे – अन् म्हणून मी तावडतोब कामाला लागलों, अन् शोभाला सांगितलं कीं आज मी एक झकास चित्र काढणार आहें – मला बिलकुल त्रास देऊं नकोस – फक्त चहा दे थोडा जास्त. पण मी चित्र काढीत असतांना मधेंच ती म्हणाली – " आज रविवार आहे, कपडे बदलवा बरं, धोबी येईल आत्तां, अन् लिहून घ्या सगळे कपडे वहींत. " माझ्या अगदीं जीवावर आलं तें काम; म्हणून मी थोडा त्रासूनच म्हणालों कीं आज मला धोबी नाहीं अन् बीबी नाहीं ! (खांसाहेब हंसतात) आतां शोभाचं तुम्हांला ठाउकच आहे – तिच्या टाइमटेबलांत थोडा गोंधळ झाला -- झालं ! (शोभा ट्रेमधें टीपॉट, कप, दूध, साखर इत्यादि घेऊन प्रवेश करते. तिला पाहून विषय बदलवीत) खांसाहेब, आज अशी मस्त रागदारी सुनवा – शोभानें गाण्याची मेहनत अलिकडे अजिबात बंद केली आहे – पहा, तिला सांगा कांहीं तरी – (अंगांतलें ॲप्रन काढून टाकतो)

**खां सा०**–(एकदम चमकून) अँ ! शोभाबाई ! साहेब काय म्हनतेत !

**शोभा**--साहेबांनाच विचारा, मला गाण्याच्या मेहनतीला केव्हां फुरसत मिळते ती ! चला, चलतां ना बाबांकडे – (पायऱ्या चढूं लागते)

**खां सा०**–(सारंगी उचलण्यासाठीं वळतात, पण त्यापूर्वीच प्रकाश ती उचलून माडीवर जायला वळतो. तेव्हां त्याच्या मागोमाग जातांजातां आपल्याच मनाशीं जरा मोठ्यानें पुटपुटतात) थोडासा भी रियाज नाहीं केला त इतक्या वरसाची तालीम वाया नाहीं जाईल ! सकाळच्या पहरीं एक पंधरा मिलट खरज लावला त कांहीं नुकसान होतें—!

(वरच्या मजल्यावर जाणाऱ्या जिन्यानें जातात. पांचदहा सेकंद स्टुडियोमध्यें कोणीच नसतें. नंतर अन्तू व पराडकर प्रवेश करतात. अन्तूच्या अंगांत खादीचा शुभ्र नेहरू शर्ट व पैजमा आणि पायांत वहाणा आहेत. डोक्याला कांहींच नाहीं. सिगरेटवर सिगरेट पेटवून तो सतत धूम्रपान करीत असतो. बोलण्यांत बिनचूकपणाचा अभिनिवेश ओतप्रोत भरलेला असतो. त्याच्या एका हातांत 'ज्ञानदीप' साप्ताहिकाचा ताजा अंक आहे. पराडकरच्या अंगांत खादीचा शुभ्र नेहरू शर्ट व त्यावर रेशमी जाकीट आहे. पायांत चुस्त पैजामा आणि नाजुक पंजाबी जोडा आहे. हातांत झक्क चामड्याची ब्रीफकेस आहे. डोक्याला शुभ्र खादीची टोपी. पराडकरचें बोलणें होतां होईल तों 'आपकी सेवा मे' हात जोडून असतें. वागण्यांत बराच उत्साह आणि तडफ आहे. दोघांचेंहि वय तिशीच्या जवळपास आहे. )

**अंतू**–(इकडेतिकडे पहात खाजगी दरवाज्याशीं जाऊन) कुठे गेले बेटे हे ! अरे प्रकाश ! (मोठ्यानें) ए शोभे !

**प्रकाश**–(माडीवरूनच) कोण अन्तू ?

**अन्तू**–हां–काय करतो आहेस रे वरती ? खालीं ये ना.

**प्रकाश**–येतों हं – एक दोन मिनिटं थांब – आलोंच !

**पराडकर**--(इकडून तिकडे भिंतीवरील चित्रें पहात) येऊं द्या सावकाश, कामांत असतील तर —

**अन्तू**–फतरे काम ! बसला असेल बायकोच्या भोंवतीं गोंडा घोळत, नाहीं तर सासऱ्याची सेवा करीत !

**पराडकर**–(टेबलावरची फोटोफरेम उचलून) मिस्टर अँन्ड मिसेस वनमाली वाटतं !

**अन्तू**–(ईझलवरचें चित्र पहात असतो तिकडचें लक्ष न काढतां) अं ऽ ऽ ?

**पराडकर**–किती शिकल्या आहेत या ?

**अंतू**–( लांबूनच तिकडे पाहून ) एम्. एस्सी. आहे ती — फिजिक्सची. ( पराडकरकडे जात ) कॉलेज करीयर खूपच ब्राइट होता तिचा.

**पराडकर**–फिगर वगैरे छानच आहे !

**अंतू**–लहानपणीं तर अगदीं नक्षत्रासारखी होती. पण त्या वन्य माळ्याच्या गळ्यांत पडून त्याचा अन् आपलाहि खातमा केला आहे तिनं ! कसल्याहि अंगमेहनतीला अगदी पठाण असल्यामुळं धुणींभांडी अन् उष्टीं खरकटीं करणारी पर्फेक्ट हाउसवाइफ झाली आहे आतां ती !

**पराडकर**–अहो हळू बोला ! ( हात जोडून ) आपली त्यांची अजून ओळखहि नाहीं ! ( फोटोफ्रेम ठेवून देतो व जवळच टांगलेलें चित्र पहात कांहीं वेळानें ) मिस्टर वनमाळी हाडाचे आर्टिस्ट दिसतात, हं ! लाईन तर फारच सफाईदार आहे गृहस्थाची ! किती शिकले आहेत हे ?

**अन्तू**–तोसुद्धा ग्रॅज्युएट आहे – पण तुम्ही त्याच्याशीं प्रत्यक्ष बोलाल तर प्रश्नच पडेल तुम्हांला – हा बी. ए. आहे की जी. ए. ! एखाद्या लहान पोरीसारखा हळवेपणा, त्याच्या प्रत्येक वाक्यात दिसून येईल तुम्हांला.

**पराडकर**–(थोडा भिऊन हात जोडीत ! ) अहो मेहेरबान ! आपल्याला तुमच्या या विनोदाची आतां भीति वाटायला लागली आहे ! पहिल्याच भेटींत त्यांचं अन् माझं भांडण लावून द्यायचा विचार नाही ना तुमचा ! ( ईझलसमोर येऊन उभा होतो – अन्तू सिगरेट पेटवीत हंसत असतो ) काय आयडिया आहे या चित्राची, कांहीं ध्यानांत येतय् का ? लहानपणीं मलाहि नाद होता चित्रकलेचा, पण आतां कित्येक वर्षात एक लाइन काढली नाहीं मी !

**अन्तू**–माझंहि नाहीं का तसंच झालं थोडंफार ! एके काळचा नांवाजलेला कादंबरीकार मी ! पण आतां दर आठवड्याला रुक्ष राजकारणाच्या भक्ष्यस्थानीं पडत असतों ! तरीपण एक आहे हं ! गेल्या चारपांच वर्षांत राजकीय परिस्थिति एकसारखी उलटसुलट होत असली तरी माझ्या स्फूर्तीची अंतर्ज्योत अन् या ज्ञानदीपांतली क्रांतिज्योत एकदांहि विझली नाही, कीं मंदावली नाहीं !

**पराडकर**–हेवा वाटण्यासारखीच आहे तुम्हांला प्राप्त झालेली ही देणगी! या ज्योतींना तेलाचा अखंड पुरवठा करणं – ( 'म्हणजे थट्टा नाहीं' असें म्हणण्यापूर्वीच प्रकाश व त्याच्या मागोमाग शोभा माडीवरून येतांना दिसतात. )

**प्रकाश**–( खालीं उतरतांनाच पराडकरला नमस्कार करतो व अन्तूला उद्देशून ) I am sorry you were detained – पण खांसाहेब आले आज बरेच दिवसांनी – त्यांना घेऊन गेलों होतो बाबासाहेबांकडे.

**अन्तू**–( ओळख करून देतो ) मिस्टर पराडकर – इथल्या रेनबो लिथो वर्क्समधें मॅनेजर म्हणून तीनचार महिन्यांपूर्वी नेमणूक झाली आहे यांची; मिस्टर अँड मिसेस वनमाली – यांच्याबद्दल माहिती दिलीच आहे मी तुम्हाला – तुझी चित्रशाळा पहायची होती यांना.

**प्रकाश**–बसा ना आपण.

**पराडकर**–( उभ्या उभ्याच ) What a shame ! आमच्या लिथो प्रेस-पासून पन्नास यार्डसुद्धां दूर नसेल आपली ही शाळा, पण आजपर्यंत मी आलों नाहीं या इथं – आज यांचा 'ज्ञानदीप' निघणार म्हणून काल रात्रीच ठरवलं कीं आज उठल्याबरोबर पहिलं काम आपली भेट घ्यायची. (शोभाला) बसा ना आपण.

**शोभा**–आपण बसा, मी जाऊन येत्ये जरा आंत. ( जाते )

( प्रकाश, अन्तू व पराडकर खुर्च्या–स्टुलें घेऊन बसतात. )

**प्रकाश**–आपण आलांत खरे, पण तसं पाहण्यासारखं आमच्या शाळेंत फारसं कांहीच नाहीं.

**पराडकर**– छे, छे, छे ! हा अगदीं विनय आहे आपला. ( 'शिष्यस्तेऽहं' च्या आविर्भावांत ) आतां पाहातच होतों कीं आपलीं कामं मी – ऑने-स्ट्ली मला तर वाटलं कीं आपल्या हाताखालीं शिकायला यावं कांहीं दिवस तरी ! –– किती विद्यार्थी येतात आपल्या शाळेंत ?

**प्रकाश**–विद्यार्थ्यांची संख्या नियमित अशी कधींच रहात नाहीं. समर व्हेकेशनमध्यें मात्र असते बरी गर्दी – कांहीं मुलं येतात षोक म्हणून त्या वेळीं. पण एरव्ही वीस पंचवीसच्या वर कधीं जात नाहीं विद्यार्थ्यांची संख्या.

**पराडकर**–ड्रॉइंग मटेरियल तरी ? पेन्टस्–पेपर तरी मिळतो का पुरेसा?

**प्रकाश**–(निराश झाल्यासारखा) छे हो ! तें कांहीं विचारूं नका. शाळेच्या उत्पन्नाच्या मानानं ड्रॉइंग–मटेरियलसाठीं भलतीच ब्लॅक मार्केट प्राइस द्यावी लागते – त्यामुळें चांगलीं काम करणं अगदीं अशक्य होत चाललं आहे आतां. एक दोन विद्यार्थी अतिशय होतकरू आहेत आमच्या शाळेंत. या, त्यांचीं कामं पहा हीं. (उठून भितीवरील एका चित्राकडे वळतो. पराडकर त्याच्या मागोमाग जातो) हें डिझाइन विद्या भागवत म्हणून एक मुलगी आहे तिच्या हातचं आहे. पोरगी कलेची अगदीं जिवंत प्रतिमा आहे – पण कागदाचा दोष पाहिलांत – तुमच्या नजरेला आल्याशिवाय रहाणार नाहींच म्हणा—

**पराडकर**– खरोखरच सुंदर आहे हं ! But how sad ! (एकदम आठवल्यासारखं करून डोकें खाजवीत) मी असं करूं का ? तुम्हांला चांगला व्हाईट ड्रॉइंग पेपर पाठवून देऊं का थोडासा ? आमच्या प्रेससाठीं आम्हांला टनांनीं घ्यावा लागतो तो.

**प्रकाश**–पण आपली अडचण –

**पराडकर**–छे ! छे ! एखाद दोन रीम तुमच्या शाळेसाठीं स्पेअर करणं कांहींच कठीण नाहीं – अन् कंट्रोल प्राईसनीच देईन. मग तर झालं ! (हंसतो) काळजी करूं नका !

**प्रकाश**–(उपकाराच्या ओझ्याखाली दडपल्यासारखा) तसं कराल तर फारच मेहेरबानी होईल बुवा ! पहा तुमची अडचण न होतां शक्य असेल तर–

**पराडकर**– Oh ! please dont mind ! ( ईझलकडे हळू हळू वळत ) बरं पण का हो, तुमच्या शाळेंत कमर्शल आर्टचं काम होतांना दिसत नाहीं मुळींच !

**प्रकाश**–अगदीं खरं आहे तें ! माझे श्वशुर – त्यांच्याच जवळ शिकलों मी पेन्टिंग–त्यांच्या उमेदींत कमर्शल आर्टचं तितकंसं महत्त्व वाढलं नव्हतं आपल्या-कडे, अन् खरं म्हणजे स्वभावतः माझा कलहि नाहीं फारसा त्या दिशेला.

**पराडकर**–पण हें बरोबर नाहीं हं – कारण त्याच ब्रँचमधें तर आतां खूप स्कोप वाढला आहे – पोस्टर्स, ॲडव्हरटायझिंग, वीव्हिंग डिझाईन्स,

लेबल्स, कार्टन्स, – आपल्यासारख्या आर्टिस्टला त्या ब्रँचमधें हात घातला तर कितीतरी बाजूंनीं पैसा मिळवितां येईल – मी असं करतों, घरीं गेल्या-बरोबर ड्रॉइंग पेपरबरोबर कमर्शल आर्टवरची थोडीं पुस्तकंहि पाठवून देईन. ( ईझलपुढें उभा होऊन ) काय कल्पना आहे या चित्राची ? भंगिणीचं अन् तिच्या पोराचं चित्र आहे का हें ? – या झाडूवरून तरी असं वाटतं —

**प्रकाश**–करतां येते का तशी कांही कल्पना ! – मला प्रश्नच होता !

**अन्तू**–( आतापर्यंत आपलाच ‘ ज्ञानदीप ’ आपुलकीनें वाचण्यांत गुग झाला असतो. पण भंगिणीचा विषय निघतांच, एकदम उसळल्यासारखा उभा होऊन ) तुला विषय तर फारच छान सुचला ! – वा ! या टोपल्यांत खराटयाशेजारीं आपलं मूल ठेवणारी ही आई – आईच ना ही त्याची ?

**प्रकाश**–हो – कां ?

**अन्तू**–तुला काय आयडियल सांपडलं या विषयांत ?

**प्रकाश**–( वाद टाळण्याच्या हेतूनें ) अरे तें पुरतं व्हायचं आहे अजून – तें पुरतं झालं – [ म्हणजे नीट ध्यानांत येईल ]

**अन्तू**–तरी पण आपल्या व इतरांच्या आरोग्याला बाधा पोंचेल अस कोणतहि कृत्य करणं म्हणजे नागरिकत्वाचा बेदरकारपणें खून करणं आहे हें कसं विसरतोस तूं ? त्या कृत्याचा परिणाम भयानक स्वरूपांत रंगवण्याऐवजीं हें मूल इतकं गोंडस अन् गुटगुटीत काढणं म्हणजे अस्वच्छतेची प्रतिष्ठा वाढविणं आहे, ही साधी गोष्ट तुझ्या ध्यानांत कशी येत नाही ? कोणत्या गोष्टीवर अन् कसा एम्फसिस द्यायचा – [ याचं तारतम्य सोडून ]

**प्रकाश**–अरे पण तू इतकी काळजी कां करतोस ? आज तें मूल वाढतं आहे आईच्या अंगावर – उद्यां तें तुझ्यासारख्या गर्भश्रीमंताच्या घरच्या पत्रावळींतलीं उष्टीं पक्वान्नं खाऊं लागलं म्हणजे होईल कीं तुला हव्या असलेल्या ‘ आयडियल ’ पोरासारखं !

( पराडकर या बरोबरीच्या कुस्तींतून अंग काढून हंसत हंसत एका खुर्चीवर बसतो. )

**अन्तू**–( झटका आल्यासारखा ) अरे हो ! कोटचा केल्यांनीं खोटचा गोष्टी लपत नाहींत, समजलास ! स्वच्छतेची जाणीव गरिबीवर किंवा

श्रीमंतीवर असते काय ! अनेक श्रीमंतांच्या महालांपेक्षां असंख्य गरिबांच्या झोंपड्यांत कितीतरी अधिक स्वच्छता माझ्या पहाण्यांत आली आहे – पण अस्वच्छ राहणारे, गलिच्छ कपडे घालणारे, वाटेल तिथें सर्वांच्या समोर थुंकणारे गरिबीमुळं असं करतात असं भासवून त्यांच्या गरिबीच्या भांडवला-वर स्वतःला गरीबांचे कैवारी म्हणविणारे समाजद्रोहाचं केवढं पाप – [कर-तात तें कोट्या करून झांकतां येणें शक्य नाहीं – ]

**प्रकाश**–गरिबांच्या असंख्य झोंपड्या ! – कधीं पाहिल्यास तूं ! – इतक्या वर्षांत मी कसं पाहिलं नाहीं तुला महारवाड्याच्या बाजूला फिरायला जातांना !

**अन्तू**—घरांत बसून रहा दिवसरात्र ! – म्हणजे सगळं दिसेल तुला ! ( सिगरेट पेटवायला लागतो. )

**प्रकाश**–( न डगमगतां हंसत हंसत ) कां रे ! मला वाटतं तूं आजकाल याच विषयावर कांहीं तरी वाचीत नाहीं तर लिहीत असला पाहिजेस ! पाहूं बरं तुझा तो ‘ ज्ञानदीप . ’ ( अंतू हात मागे घेतो ) अरे पाहूं तर दे !

**अंतू**–( खोटा राग दाखवीत ) कांहीं नको ! तुला कांहीं समजणार नाही तें वाचून – नीट वाचतां सुद्धां येणार नाहीं तें तुला ! मीच वाचून दाखवतों तुला – पहा कांही समजलं तर ! ऐक. ( अंक चाळूं लागतो. इतक्यांत शोभा चहाचें ट्रे घेऊन प्रवेश करते. आतां ती मघापेक्षां जरा नीट-नेटकी दिसते आहे. )

**शोभा**– (खणखणीत आवाजांत) आधीं असं करा – आपलं हें ‘ राष्ट्रीय ’ पेय घ्या आधीं !

( पराडकर थोडा अदबीनें उठून पुन्हा बसतो. शोभा त्याच्यापुढें आणि नंतर अन्तू व प्रकाश यांच्यापुढें एकेक कप ठेवून चहा ओतते. पराडकरच्या कपांत साखर टाकण्यासाठीं ‘ किती ’ अशी मुद्रा करून थांबते )

**पराडकर**–बस्, एकच चमचा पुरे –

**शोभा**– ( अन्तूच्या कपासमोर चमचा धरून ) तुम्हांला हो ? ( पण एकदम आठवण होऊन ) अरे ! तुम्ही साखरेशिवाय चहा घेतां हें लक्षांतच रहात नाहीं माझ्या ! (प्रकाशच्या कपांत थोडी साखर टाकते )

**पराडकर**– ( शोभानें स्वतःसाठीं कप आणला नाहीं हें लक्षांत येऊन ) म्हणजे आपण ? आपला कप कुठें आहे ?

**अन्तू**– त्या चहा घेत नसतात कधीं ! ( तिच्याकडे पहातो ) मी साखरे-शिवाय चहा घेतों तशा या चहाशिवाय दूध पितात !

**पराडकर**–( तिच्याकडे हंसून पहात ) दुधानें प्रकृति खरोखरच छान राहते असं माझंहि मत आहे – पण आपण कांहींच घेत नाहीं ?

**शोभा**– कांहीच कसं घेत नाही ! ( अन्तूच्या हातांतला 'ज्ञानदीप' जवळजवळ हिसकून घेते ) यांतलं ज्ञानामृत पितें कीं—

**अन्तू**– (नाइलाज झाल्यासारखा) तूं सगळा विचका केलास माझ्या आवेशाचा. याचं हें आतांचं भंग्यावरचं प्रेम दुरुस्त झालं असतं त्यांतला लेख ऐकून (तिघे चहा घेऊं लागतात.)

**शोभा**–('ज्ञानदीप' चाळीत असता) कां बरं ? भंग्यावर प्रेम करणंच काय, पण प्रत्येकानें स्वतः भंगी झालं पाहिजे हें तर तुमच्या सेवाधर्मावर आधार-लेल्या क्रांतीचं एक ब्रीदवाक्य आहे ('ज्ञानदीपा'वरची नजर न हालवितां) तुम्ही कधी होणार आहांत भंगी ? का ऑलरेडी झाला आहांत ? हो ! लौकरच भंग्यांचा संप होणार आहे म्हणतात, तेव्हा तुमच्याजवळ आपली वर्णी लावून ठेवलेली बरी ! (मजकूर सांपडल्यासारखी प्रकाशकडे पहात व पराडकरलाहि उद्देशून)– ऐकलं का ? हे ऐका(वाचते)"संपवाल्यांना आणि स्वतःला संपवाल्यांचे पुढारी म्हणवणाऱ्याना नागरिकत्वाचें यत्किंचित् महत्त्व वाटत नाहीं. "(जोरानें हंसते. )

**अन्तू**— ( तिच्या हातांतला अंक हिसकण्याचा प्रयत्न करीत थोडा चिडल्यासारखा ) काय, हंसायला काय झालं तुला ?

**शोभा**– ( अंक मागें धरून ) कांहीं नाहीं, मला एक गोष्ट आठवली तुमच्या या वाक्यावरून – परवां धनतोलीतल्या एका झोंपडीला आग लागली. मला वाटतं शेजारच्या महालांतून कोणीतरी जळती सिगरेट फेंकली होती त्या झोंपडीवर. झालं, झोपडीवर गवतच होतं – तें लागलं पेटायला अन् त्यांची किटाळं लागलीं शेजारच्या त्या 'अंबल कॉटेज' नामक महालावर उडायला – तेव्हां त्या कॉटेजचे मठाधिपति सुद्धां असंच कांहींतरी म्हणत होते – "आपल्या झोंपड्या ज्वालाग्राही गवतांनीं शाकारणाऱ्या या मठ्ठ लोकांना नागरिकत्वाचें

यत्किंचित् महत्त्व वाटत नाहीं." तसंच तुमचं आहे हें ! (हंसते) आतां पुढचं ऐका ! (टिंगल करीत असल्यासारखी वाचते) "आधीं क्रांति — ऊर्फ अराजकता — आणि मग सर्व कांहीं अशी त्यांची भूमिका असते. वस्तुत: कामगार—किसान हा आधीं नागरिक आणि नंतर कामगार—किसान असतो. पण त्याचे मठ्ठ व नादान पुढारी मात्र त्याच्या नागरिकत्वाचा खून करून त्याला अमानुष बनवतात. याच्या उलट गांधीप्रणीत नागरिकता ही अंतर्बाह्य शुचितेवर आधारलेली असते. पण तिचा द्रोह करणारे कामगार व त्यांचे पुढारी जनतेचा अंतर्बाह्य ऱ्हासच साध्य करीत असतात. ही गोष्ट प्रत्येक खेड्यांतील व प्रत्येक शहरांतील प्रत्येक स्त्रीपुरुषाला पटली पाहिजे. ही गोष्ट जर त्यांना पटली आणि सारा हिंदुस्थान देश आज आहे त्यापेक्षां स्वच्छ व सुंदर देश झाला तर, तो, या उच्च ध्येयाप्रीत्यर्थ दरिद्री झाला तरी सुसंस्कृतपणाबद्दल त्याची कीर्ति त्रिखंड गाजेल !" ( अन्तूकडे पाहून ) बस्, एवढंच ! ही अंतर्बाह्य शुचिता कशी साध्य करायची याबद्दल कांहीं टिप्स द्यायला पाहिजे होत्या तुम्ही ! उदाहरणार्थ (ती त्याची टिंगल करीत आहे हें उघड आहे) Inner cleanliness comes first ! — तेव्हां अंत:शुचितेसाठी Andrew's Liver Salt अन् बाह्यशुचितेसाठीं सर्व नटींनी वाखाणलेला Lux Toilet Soap या दोन मौल्यवान द्रव्यांचा सुसंस्कार करायला आजपासून झटलें पाहिजे, अशीं एकदोन वाक्यं [टाकायला हवीं होतीं ].

**प्रकाश**—(पराडकरला) कां हो, अशीं वाक्यं टाकलीं म्हणजेच होते का कमर्शल आर्ट ?

**पराडकर**—(थोडासा ओशाळतो तरीपण बेरड असल्यामुळें हंसत हंसत) That's fine ! हा : हा : हा : !

**शोभा**—थट्टा राहो, पण तुमचा हा लेख म्हणजे चोराला सोडून संन्याशाला फांशी देण्यासाठीं उगाच कागावखोरपणानीं हाताच्या मुठी वळून लिहिला गेला आहे असं नाहीं वाटत ! संपाची परिस्थिति — [ कशामुळं निर्माण होते ]

**अन्तू**— मग ! हातांत बांगड्या भरून लिहायला पाहिजे होता हा लेख असं तुझं म्हणणं !

**शोभा**– बांगड्यांचा मार कसा असतो तें ठाऊक नाहीं म्हणून चालल्या आहेत एवढया गमजा ! नशिबानें बायको गरीब मिळाली आहे – [ नाहीं तर – ]

**अन्तूः**–आहे खरंच तसं ! तुझ्यासारखी मिळाली असती तर याच्या-सारखा ( प्रकाशकडे पहात ) झालो असतो !

**प्रकाश**– (न डगमगतां, गमतीनें) काय झालं रे मला ! कुस्ती खेळतोस ?

**अन्तू**– (हेटाळणीच्या स्वरांत) बॅस ! येऊनजाऊन तेंच ! मठ्ठ मेंदूला लठ्ठपणाशिवाय कशाचं भूषण वाटणार आहे ! (पराडकरला) काय, झाली कीं नाहीं यांची ओळख ? चला – (इतक्यांत माडीवर सारंगीच्या तरफा वाजत असतात त्या ऐकूं येऊं लागतात.)

**पराडकर**– (घड्याळाकडे पाहून) खरंच, I must go now.

**प्रकाश**– बसा हो ! खांसाहेबांची सारंगी तर ऐका थोडी ! हा लेकाचा कोणाला कांहीं बोलूंच देत नाहीं ( अन्तूला ) थोडा स्वस्थ तर बैस–

**पराडकर**– खरंच माफ करा–आतां ओळख झालीच आहे–पुन्हां येईन आतां केव्हां तरी आरामानी –( शोभाला ) thank you हं ; तुमचा चहा, अन् तुमचं एकंदर काव्य – शास्त्र – विनोद – सर्वंच – I have really enjoyed this morning (उठतां उठतां) अच्छा तर, मी पाठवून देतों हं ते कागद अन् पुस्तकं ताबडतोब – नमस्कार ! ( जाऊं लागतात )

**प्रकाश**–Thank you, really ( पराडकर व अंतूला दरवाजापर्यन्त पोंचवून परततो व कोचावर येऊन बसतो. शोभा खांसाहेबांच्या सारंगीबरो-बर चीज गाऊं लागते. प्रकाश डोळे मिटून ऐकत स्वस्थ बसला असतो. )

**शोभा**–– ( सामानाची आवराआवर करीत गात असते )

( शुद्ध भटियार )

**पिया बिन मोहे कल ना पडे**
**सगरी रतिया ना पिया आये**
**किन सौतन बिरमाये**

(वर सारंगी वाजत असतेच–पण शोभा गात असतां मधेंच थांबून चहाचे

ट्रे आणि प्रकाशचें ॲप्रन घेऊन घरांत जाते. हें लक्षांत येताच प्रकाश डोळे उघडतो. चारपांच सेकंदांतच ती धुतलेलें एक ॲप्रन घेऊन बाहेर येते व त्याच्या कोचावर ठेवते आणि गुणगुणत घरांत जायला वळते. ही गोष्ट लक्षांत येतांच)

**प्रकाश**–शोभे! (गुणगुणत असल्यामुळें तिला ऐकूं आलें नसावें असें समजून जरा मोठ्यानें) शोभे !

**शोभा**–(खोटया त्रासिकपणें लांब हेल काढून ) अं ऽ ऽ ! (थांबते)

**प्रकाश**–राहूं दे ना तुझीं कामं जरा.

**शोभा**–(कामाचा कांहींतरी चाळा करीत) चला ! आपण करणार नाहीं अन् दुसऱ्याला करूं देणार नाही ! (पुन्हां एक तान गुणगुणत ती आंत जायला वळते हे लक्षात येतांच काकुळतीच्या स्वरांत तो मोठ्यानें हाक मारतो)

**प्रकाश**–शोभे! (शोभा परतते व त्याच्यासमोर येऊन आपलें हंसणें दाबत उभी होते, प्रकाश तिच्याकडे नुसता पाहतो, आणि आतां पाहणें झालें अशी मुद्रा करून ) बस् – झालं माझं काम – तुझा राग गेला की नाहीं एवढंच पहायचं होतं मला —

**शोभा**— ( घरांत परत जातां जातां खोटया रागानें ) कांही नाहीं जायचा माझा रागबिग तुमचं तें चित्र पुरं होईपर्यंत !

**प्रकाश**–( तिच्या मागोमाग ईझलकडे जात ) फाडून टाकतो तें चित्र एकदाचं – किती मत्सरी असतां ग तुम्ही बायका !

**शोभा**–( त्याच्या आणि ईझलच्या मधें उभी होउन त्याच्याकडे कठोर नजरेनें पहात ) कांहीं नाही फाडायचं तें – तें पुरतं केलंच पाहिजे तुम्ही !

**प्रकाश**– तू किनई मोठी हटवादी आहेस !

**शोभा**– हो, आहे मी – मत्सरी, हट्टी, रागीट – अन् तुम्ही अगदीं शंभर टक्के कलावंत आहांत नाहीं का ? ( प्रकाश पराजित होऊन परततो व पुन्हां पूर्ववत् कोचावर धाडकन् येऊन बसतो आणि डोळे मिटतो. ती त्याच्याकडे चारपांच सेकंद पाहते आणि मनाशीं निश्चय ठरविल्यासारखी त्याच्याजवळ तितक्याच जोरानें येऊन बसते.)

**प्रकाश**–( मेटाकुटीला येऊन खुदकन् हंसतो ) बरं मी हरलों – झालं –

आतां तर सांग त्या चित्राला तुझा एवढा विरोध कां म्हणून आहे तें – तुला इतकं रागवायला काय झालं ?

**शोभा**-( खरें बोलायचे ठरवून ) खरं सांगू ? मी मुळींच रागावलें नाहीं. अन् माझा त्या चित्राला विरोध तरी कां म्हणून असेल ! पण तुम्ही सकाळींच जेव्हां मला त्या चित्राचा विषय सांगितलात तेव्हांच मला वाटलं कीं तें तुम्हांला काढतां यायचं नाहीं – अलिकडे कितीदां तरी झालं आहे असं तुमचं – अन् सांगणारहि होते मी तसं तुम्हांला, पण सांगितलं असतं तरी ऐकलं थोडंच असतं तुम्ही ! म्हणून बोललें नाहीं. तरी पण मधूनमधून मी पहात होतेच – तुमचं लक्ष नसेल – पण शेवटीं जेव्हां मला स्पष्ट दिसू लागलं कीं तुमचा हात आंखडला, तेव्हां तुमचं मन तिथून काढण्यासाठीं उगीच कांहीं-तरी निमित्त करून हाका मारीत होते झालं !

**प्रकाश**—(या सत्यान्वेषणामुळे कष्टी होतो, तरीपण उगीच वावदूकपणें) कां म्हणून वाटलं ग तुला त्या चित्रांत मला यश येणार नाहीं म्हणून ?

**शोभा**— तुम्हांला राग येणार नसेल तर सांगते –

**प्रकाश**– नाहीं येणार !

**शोभा**– पहा बरं – (अगदीं त्याच्याजवळ येऊन खेटून बसते)

**प्रकाश**– अरेच्या ! आज तुला झालंय तरी काय ?

**शोभा**–आतां मी सांगत्ये तें नीट ऐका आधीं ! ( एकेक शब्द तोलून, मोजून बोलते ) आज सकाळीं, त्या भंग्याच्या पोराच्या डोळ्यांत काय दिसलं म्हणालांत तुम्ही ?

**प्रकाश**–उज्ज्वल मानवतेची अस्फुट ठिणगी, असं कांहींसं म्हणालों मी.

**शोभा**–त्या ठिणगीचं चित्र, ती तुमच्या मनांतल्या मनांत गडप होण्या-पूर्वीं काढायला हवं असं म्हणालांत, नाहीं कां ? चित्राची कल्पना अन् त्या कल्पनेचं शब्दचित्र, खरोखरच छान होतं तें. उज्ज्वल मानवतेची ती अस्फुट ठिणगी तुम्हांला आपल्या कलेच्या द्वारें प्रज्वलित करतां आली नाहीं तर ती विझून जाईल अशी भीति तुम्हांला वाटते. ती न विझतां प्रज्वलित झाली तर तुम्हांला कितीतरी आनंद होईल हें खरं आहे. पण सत्यसृष्टींत, सामा-जिक जुलुमामुळें दबलेली व कोंडलेली कोणतीहि ठिणगी प्रज्वलित होते ती स्फोट करूनच होते – अन् स्फोट म्हणजे कोंडमारा

करणाऱ्याचा अन् भोंवताली असलेल्यांचा विध्वंस, हत्या – हेंहि तुम्हांला ठाऊक आहे. तेव्हां तुमच्यापुढें अजून प्रश्न आहे कीं ती अस्फुट ठिणगी विझूं द्यायची कीं आपल्या कलेची काडवात लावून तिचा विध्वंसक स्फोट होऊं द्यायचा – इथं खरी पंचाईत आहे ! हॅम्लेट म्हणतो त्याप्रमाणें There is the rub – तुमचं अगदीं असंच झालं आहे – काय, खरं कीं नाहीं ?

**प्रकाश**–(निरुत्तर झाला आहे, पण गोष्ट कबूल न करतां) सांग, तूंच सांग सगळं – सध्यां मी नुसतं ऐकायचं ठरविलं आहे !

**शोभा**– आतां आणखी विशेष कांहींच सांगायचं नाहीं मला ! एकीकडे त्या ठिणगीबद्दल सहानुभूति बाळगायची पण दुसरीकडे तिचा विध्वंसक परि. णाम मात्र होऊं द्यायचा नाहीं – ही जी पंचाईत आहे, तिचा कोणता तरी एक निकाल तुमच्या मनांत लागेल तेव्हांच तें चित्र पुरं होईल, अन् तुम्हांला समाधान होईल ! एवढंच ! ( तिच्या डोक्यांत एक कल्पना चटकन् आल्या-सारखी ती उज्वलित होते – चारदोन सेकंद त्याच्याकडे मिस्किलपणें पहाते व मग थोडया थट्टेखोरपणानें ) माझ्या एका मैत्रिणीच्या नवऱ्याची थोडीशी अशीच गोष्ट झाली आहे —

**प्रकाश**– ( एकदम जिज्ञासेनें ) कोणती मैत्रीण ?

**शोभा**– तुमच्या ओळखीची नाहीं ती – तिच्या नांवाशीं काय करायचं आहे तुम्हांला ? तिच्या नवऱ्याची गोष्ट सांगते तेवढी ऐका – तिच्यावर किनई तिच्या नवऱ्याचं अतिशय, कमालीचं प्रेम आहे. त्या प्रेमाची दिव्य ज्योत केव्हांहि विझू नये असं त्याला सारखं वाटतं – पण – पण त्या प्रेमाच्या 'परिणामा'ची मात्र त्याला फार भीति वाटते – काय, आलं कां लक्षांत ?

**प्रकाश**–( क्षणभर विचार केल्यानंतर ) आलं, आलं, चांगलं आलं ! – पण मला वाटतं तिचा नवरा माझ्यासारखाच गरीब असेल – प्रेमाच्या त्या 'तसल्या' परिणामासाठीं बाबा – गाडी कुठून आणूं ! पेपरमिंट किती लागेल! आया कशी परवडणार ! असल्या विवंचना त्याला पडत असतील !

**शोभा**–पडत असतील – पण माझी मैत्रीण त्याला काय म्हणते ठाऊक आहे का ? ती म्हणते – गरिबीमुळं पोट पाठीला जरी चिकटलं तरी त्या अडचणींत सुद्धां त्या लहानशा 'परिणामा' ला आपला वाढता संसार थाटण्यापुरती

जागा सहज सांपडते ! ( त्याच्याकडे थोडीशी पाठ वळवून ) अन् हें ऐकलं कीं तिच्या नवऱ्याच्याच पोटांत धस्स होतं ! ( त्याच्याकडे पाहून हंसते. )

**प्रकाश**-( तिची खोड जिरविण्याची एक कल्पना सुचल्यासारखा ) ए ! -थांब हं-थोडी थांब ! प्रेमामुळें एकजीव झालेल्या त्या जोडप्याची गोष्ट ऐकून मला एक छान कल्पना सुचली आहे. तूं डोळे मीट, म्हणजे इथल्या इथं त्या कल्पनेचं चित्र काढून दाखवतों !

**शोभा**-( त्याच्यापासून दूर होऊन ) दूर व्हा ! डोळे मीट म्हणे ! तुमचं कोणचं कपोलकल्पित चित्र आहे तें दुरून काढणार असाल तर मिटत्यें डोळे !

**प्रकाश**-( दुसरी नवीन कल्पना सुचल्यासारखा ) असं ? बरं दुरून काढतों ! ( दूर जातो ) हं मीट बरं आतां डोळे.

**शोभा**-( डोळे मिटून ) जवळ आलांत तर पहा हं !

**प्रकाश**-( काळ्या शाईत एक लांब ब्रश बुडवून तिच्यापासून दूर उभा राहूनच ) पुरुष आणि प्रकृतीचा एकजीव झाला म्हणजे काय होतं त्याचं एक फार छान प्रतीक आपल्या पुराणांत सुचवलं आहे. त्या प्रतीकाचं नांव आहे अर्धनारीनटेश्वर ( असें म्हणून त्या ब्रशानें तिच्या नाकाखालीं मिशी-सारखा फराटा काढतो )

**शोभा**—( नाकाखालीं ब्रश लागतांच एक जोराचा झटका त्या ब्रशाला देऊन मोठ्यानें ओरडते) ए- !

(इतक्यांत कॉलबेल वाजते. त्यासरशीं ती आपलें नाक पुसत घरांत धांवत जाते. )

**प्रकाश**- (हंसत हंसत दाराकडे वळून ) Come in ! ( दार उघडतो)

( प्रवेश करणारा गोविंद २५।२६ वर्षं वयाचा आहे. त्याच्या खांद्यावर ड्राइंग-पेपरचे दोन रीम आहेत. एका हातांत पुस्तकांनीं भरलेली एक पिशवी आहे. अंगांत बनियन व मलेशियाची पँट आहे. पायांत मिलिटरी बूट. अनेक-विध रंगांनीं बरबटलेले त्याचे कपडे कितीहि धुतले तरी स्वच्छ होण्यासारखे नाहींत. डोक्यावर कांहीं नाहीं. केसांना तेल नाहीं. डोळे भेदक आहेत. प्रवेश करतांच हातांतली पिशवी तो तशीच गळूं देतो आणि दोन्ही रीम जोरानें एका झटक्यांत खालीं आदळतो. )

**गोविंद्**– मिस्टर वनमाली कोणाचं नांव आहे ?

**प्रकाश**– मीच तो.

**गोविंद्**– तर मग घ्या हें तुमचं सामान. लिथोप्रेसच्या मॅनेजरसाहेबांनीं पाठविलं आहे. (स्टूडियोंत चारी बाजूला नजर टाकतो, थकव्याचा एक निश्वास सोडतो आणि पॅटमधली अर्धवट जळलेली सिगरेट काढून) डब्बी आहे का ?

**प्रकाश**– (त्याच्या आडदांडपणाकडे थोडचाशा कौतुकानें पहातो. आपल्या खिशांतली डब्बी वाजवून पहातो. ती रिकामी असते.) थांब हं, (आंत जाऊं लागतो, पण लागलीच थोडचा अविश्वासानें परतून) बस, त्या तिथं स्टलावर बस. (आंत जातो. गोविंद स्टुलावर न बसतां भिंतीवरील चित्रें पहात उभा असतो. प्रकाश आगपेटी घेऊन बाहेर येतो व त्याच्यापुढें स्टुलावर ठेवतो) हं घे ही. (गोविद सिगरेट पेटवतो, आगपेटी स्टुलावर परत टाकतो, पण ती खालीं पडते तरी तो ती नीट उचलून न ठेवतां बाहेर जाऊं लागतो. आतांपर्यंत प्रकाश त्याच्या सर्व हालचाली अगदी बारकाईनें पहात असतो. तो बाहेर जाऊं लागतांच) अरे ! नांव काय तुझं ?

**गोविंद्**–गोविंद–कां ?

**प्रकाश**–हें पहा, ते गठ्ठे जरा त्या स्टोअर रूमच्या आंत नेऊन ठेवतोस का ? ( गोविंद तें सारें सामान उचलून आंत नेऊन टाकत असतांना ) हं, टाक त्या कोपऱ्यांत तिथं. ( सामान आदळल्याचा आवाज ) शाबास ! ( गोविंद बाहेर येऊन परत जाऊं लागतो ) गोविद, थोडा थांबतोस का ? (त्याचे खांदे धरून ग्राऊंड–ग्लासच्या भिंतीशीं उभा करून त्याच्या तोंडाची फिरवाफिरव करतो. दूर जाऊन पाहतो. ) थांब हं, तसाच उभा रहा तिथं. ( गोविद चमत्कारिक नजरेने पहात असतो. प्रकाशला समाधान होतें. ) गोविंद, थोडा वेळ थांबतोस का ? कीं घाई आहे तुला घरीं जायची ?

**गोविंद**–तुम्ही म्हणत असाल तर थांबतों–प्रेसला आज सुट्टीच आहे रविवारची–कां ?

**प्रकाश**–तर मग तूं असं कर–आंत जाऊन ते गठ्ठे अन् ती पिशवी घेऊन ये अन् मघाशी आलास ना तूं, ते खांद्यावर घेऊन, तसा उभा रहा या इथं, म्हणजे मी तुझं चित्र काढतो–जा. ( जीवावर आलें असलें तरी गोविंद

आंत जातो आणि सामान घेऊन येतो ) आतां या इथं उभा रहा. बस्, असाच थांब.

**गोविंद**–( कपाळावर आठ्या येतात ) किती वेळ थांबावं लागेल हें असं साहेब ?

**प्रकाश**–कांहीं नाहीं, दहा–पंधरा मिनिटं – अन् आज जर चित्र काढणं पुरतं झालं नाहीं तर पुन्हा तूं केव्हां येऊं शकशील तेव्हां दहा–पंधरा मिनिटं.

**गोविंद**–पण – ( असें म्हणून तो तोंड हालवतो )

**प्रकाश**–( ईझलवर नवीन चित्राची तयारी करीत ) अं हूं ! तूं बोल हवं तेवढं, पण आता हालूं नकोस बिलकुल !

**गोविंद**–( स्थिर उभा राहून ) चित्र काढण्यापेक्षां फोटो कां नाहीं काढत तुम्ही माझा ? तुम्हांला फोटो नाहीं काढता येत ?

**प्रकाश**–काढतां येतो – पण फोटोंत अन् चित्रांत फार फरक असतो !

**गोविंद**–कसला फरक ?

**प्रकाश**–( ईझलवरची फरेम काढून दुसरी बसवीत असतांना ) तो तुला सहजासहजीं समजायचा नाहीं.

**गोविंद**– पण तुम्हाला ही बुद्धि कां झाली मला समजत नाहीं. ही ओझं घेऊन उभं रहायची मेहनत माझ्या तर जीवावर आली !

**प्रकाश**– अरे, तुला दर पंधरा मिनिटाचे आठ आणे देईन, मग तर झालं !

**गोविंद**– ( त्याचें थोडें समाधान झाल्यासारखें दिसतें ) तरी पण माझं चित्र काढायची जरूर काय ?

**प्रकाश**– अरे, तुला कल्पना नाहीं– (काम करीत असतां फराटयांच्या तालांत एकेक शब्द बोलतो ) तू इतका मस्त माणूस दिसतोस ! ती तुझी छाती, तुझे दंड, तुझा राकटपणा, तुझ्या चेहऱ्यावरचा उत्साह, बेफिकिरीनें कसलीहि वेळ मारून नेण्याची तुझ्या पोटची हिंमत —

**गोविंद**– ( आश्चर्यानें ) पोटची हिंमत ! तुम्हांला पोटांतल्या गोष्टी कशा दिसतात ?

**प्रकाश**– अरे, त्या गोष्टी चित्रकाराच्या नजरेला सहज दिसतात !

**गोविंद**– असं का ? मग तुम्हांला माझ्या पोटांतली आणखी एक गोष्ट दिसत असेलच !

**प्रकाश**– कोणती गोष्ट ? ( जिज्ञासेनें त्याच्याकडे पाहतो )

**गोविंद**– ती तुमची खोली आहे कीं नाहीं – मघाशी मी सामान नेऊन टाकलं ती ?

**प्रकाश**– हं !

**गोविंद**– त्या खोलींत रहायला जागा मिळेल तर किती छान होईल असा विचार माझ्या पोटांत मघापासून घोळून राहिला आहे – तो विचार तुम्हांला दिसत असेलच !

**प्रकाश**– मोठा लबाड आहेस रे तूं !

**गोविंद**–नाहीं साहेब, लबाड नाहीं बोलत मी ! ( प्रकाश बोलत नाहीं हें पाहून ) मग मिळेल कां ती खोली मला ?

**प्रकाश**–अत्तां या क्षणीं नाहीं सांगू शकत मी – माझ्या बायकोला विचारून मग सांगेन तुला – पण कशाला हवी तुला ती खोली ? तुला रहायला घर नाहीं का ?

**गोविंद**–आज आहे; पण उद्यांचं सांगतां येत नाहीं. आज मी आमच्या म्यानेजर साहेबाच्या मोटार ग्यारेजांत राहतो, पण उद्यां आम्ही सगळे कामगार संपाची नोटीस देणार आहोंत – आपल्या शहरांत लौकरच सार्वत्रिक संप होणार आहे – अन् आम्ही संपाची नोटीस दिली की म्यानेजरसाहेब देखील मला ग्यारेजांतून हाकलून –

**प्रकाश**– (आतांपर्यंत चित्र काढण्यांत गुंतलेला असतो, पण संपाचें नांव निघतांच आपलें काम सोडून गोविंदजवळ येऊन उभा होतो) कां रे, तुम्ही कामगार लोकांनीं आजकाल हें मांडलं आहे तरी काय ? (गोविंदहि कागदाचे गठ्ठे खालीं आदळून त्याला तोंड द्यायला सज्ज होतो) जिकडे पहावं तिकडे तुम्ही कामगार लोक संपावर जातां ! तुम्हां लोकांचा विचार तरी काय आहे ? देशासाठीं उत्पादन करायचं सोडून तुम्ही साऱ्या देशाची ही जी गळचेपी चालविली आहे— [ तिचा अर्थच समजत नाहीं आम्हांला ]

**गोविंद**– ( आश्चर्यचकित होऊन ) देशासाठीं उत्पादन ! तुम्हांला कोणी सांगितलं आम्ही करतों तें उत्पादन देशासाठीं असतं म्हणून ? अहो साहेब ! आम्ही काम करतों आपल्या पोटासाठीं – अन् आमचा मालक काम करवून घेतो आपल्या नफ्यासाठीं !

**प्रकाश**– तरीपण तुम्ही संपावर जाऊन उत्पादन बंद केलें म्हणजे जनतेचे हाल होतातच कीं नाहीं देशांतल्या !

**गोविंद**–अन् आम्ही उत्पादन केलं म्हणजे हाल चुकतात का त्यांचे ? आम्ही उत्पादन केलेल्या वस्तु काळ्या बाजारांत किती विकायच्या – किती दडपून ठेवायच्या, उघड विकायच्या त्या केवढ्याला विकायच्या, हें ज्यांच्या हातांत आहे त्यांच्याविरुद्ध जर तुम्ही कांहींच करीत नाहीं तर आम्ही तरी काय करावं ? पण जाऊं द्या – तुम्हाला देशासाठीं उत्पादन अन् नफ्यासाठीं उत्पादन यांतला फरक नाहीं समजायचा! (खिशांतून सिगरेट काढून पेटवतो)

**प्रकाश**–कां बरं ?

**गोविंद**–फोटो अन् चित्र यांतला फरक मला कां नाहीं समजायचा ?

**प्रकाश**–अरे, त्याचं शिक्षण अन् प्रत्यक्ष अनुभव आल्याशिवाय नाहीं समजायचा तो फरक !

**गोविंद**–माणूस आणि मालक यांतला फरक तेवढा अनुभवाशिवाय समजूं शकतो, नाहीं ?

**प्रकाश**–( एका कामगाराच्या तोंडचे हे शब्द ऐकून थक्क झाल्यासारखा ) असं ! –

**गोविंद**–( एकदम मित्रत्वाच्या सलगीनें जवळच्या खुर्चीवर मोकळेपणानें येऊन बसतो – त्याबरोबर प्रकाशच्या आश्चर्याला सीमाच रहात नाहीं. हें पाहून ) काय दचकलांत एकदम ! अहो, वस्तुतः मी कामगार नाहीं. अन् मला कामगार समजून माझं चित्र काढायला लागलांत तर खऱ्या कामगाराच्या आत्म्याचा तुम्हाला साक्षात्कारहि होणार नाहीं !

( पडद्यांतून शोभा डोकावून पाहते व दोघांचें संभाषण जात येत मधून मधून ऐकत असते. )

**प्रकाश**–काय, तूं कामगार नाहींस? कोण आहेस मग तूं ?

**गोविंद**– मी – एकदां बी. ए. नापास झालेला, पुढें लढाईत तीन वर्षं काढलेला, आणि परत आल्यानंतर बेकारीमुळे कांहीं तरी उद्योग हवा म्हणून सध्यां लिथोप्रेसमध्यें मशीनमनचं काम शिकत असलेला, पण हाडाचा मध्यमवर्गीय माणूस आहे !

**प्रकाश**- असं ! चांगलाच फसलों तुझ्या या वेषामुळं - तरी पण मधून - मधून मला संशय येत होता बरं का !

**गोविंद**- असं कां !

**प्रकाश**- ( टेबलावरचें पानदान घेऊन त्याच्याजवळच्या एका स्टुलावर येऊन बसतो ) काय, मिळतं काय तुला या प्रेसमध्यें ?

**गोविंद**- मध्यमवर्गीयांचा भ्रमनिरास करणारा चांगलाच अनुभव मिळतो!

**प्रकाश**- कसला भ्रमनिरास ?

**गोविंद**—( पानदानांतलें पान उचलून ) कामगाराच्या श्रमसौंदर्या-संबंधीचा ! मघाशीं तुम्हांला कशी दिसत होती माझ्या गरिबीच्या पोटीं हिंमत, बेफिकिरी, सगळं कांहीं दिसत होतं. हा असला भ्रम तुम्हालांच काय, फार मोठमोठ्या लोकांना आहे - तुम्हाला रेव्हरंड टिळकांची " श्रमसौंदर्य " कविता आठवते ?

**प्रकाश**—( विचार करून ) नाहीं बुवा, सध्यां तरी आठवत नाहीं -

**गोविंद**—त्या कवितेची भूमिका अशी आहे - कवीच्या ओळखीचा होता एक फुलमाळी - पुढं बेकारीमुळं त्याचा झाला लाकुडतोड्या - अन् एके दिवशीं लाकडांचा ढीग फोडतांना त्याला कवीनं पाहिलं. कवीला साहजिकच फार वाईट वाटलं - कवि म्हणाला--

**फुलें गुंफावीं म्हणुनी तुज जन्मप्राप्ति**
**तूं फुलमाळी नलगे भ्रांति**
**कुऱ्हाड परि तव खांद्यावरती**
**हा काष्ठांचा डोंगर पुढती**
**पुरि रे फजिती - तव जन्माची ही माती !**

आतां, तो कवि अर्थातच त्याला लाकडं फोडण्याच्या कामांत मदत करूंच शकत नंव्हता ! पण त्याला तसाच तिथं सोडून जाणंहि कवीला शक्य नव्हतं - कांहीं नाहीं तरी, एखादा आशीर्वाद, शुभसंदेश तरी आपण देऊं शकतो इतका अहंकार त्याला होताच ! विचार करतां करता कवीला संदेशाची स्फूर्ति झाली - कवी म्हणाला, हें पहा! तुझ्या जन्माची माती झाली हें खरं आहे - पण मातींतसुद्धां किती मजा असते पहा! अरे खरं म्हणजे तुझं सोनं झालं — कारण —

**मातींतचि परि फुलें उगवती**
**मातीहुनि जरि भिन्न दिसती**
**अंधाराच्या उदरीं येती**
**रम्य नक्षत्रें—हीं परमेशाची नाती !**

( हंसतो ) बेकारीमुळं खरोखरच लाकडं फोडूं लागलेल्या एखाद्या फुलमाळयाजवळ कवि असं कांहीं बोलला असता तर त्यानें ती कुऱ्हाडच कवीच्या बोडख्यांत मारली असती ! पण तो होता कवितेंतला लांकूडफोड्या ! त्यानें कवीचा हा संदेश अगदीं बंगाली मिठाईसारखा खाल्ला—अन् कवीपेक्षां सवाई कवि बनून तोहि गाऊं लागला ! त्याचा घाम, त्याच्या हातापायाच्या जखमा, त्याचं सारं शरीर—फुलांनीं लदबदलेला वृक्षच बनला तो ! तो म्हणाला—

**आघातांनीं चिन्हें केलीं**
**म्हणाशिल म्हण—परि सुमनें सगळीं—**
**देहतरू हा माझा फुलला**
**घर्मबिंदुनीं म्हणशिल ओला—**
**म्हण—परि सुमनांचा हा मेळा**
**मला दे शोभा—जी अभिनव अवघ्या जगतीं !**
**बघ या अधरीं बघ या नयनीं**
**फुलें कितितरी भरलीं खचुनी**
**हीं स्वर्गांतुनि पडलीं गळुनि**
**हींच उधळीतों—मी ज्याच्यात्याच्यावरती !**

( एकदम गंभीर होऊन ) फुलांनीं लदबदलेल्या या कामगारतरूचा मलाहि एकेकाळीं हेवा वाटत असे ! पण हें सारं, एका असहाय, दुबळ्या अन् म्हणून ज्याचात्याचा हेवा करणाऱ्या कलावंतानें आपल्या दुर्बलतेला सुशोभित करण्यासाठीं गळ्यांत घातलेली कागदी फुलांची माळ असते हें मला आतां प्रत्यक्ष अनुभवानें समजून चुकलं आहे ! सत्यसृष्टींत माती ती माती, अन् फूल तें फूल असं आहे. मातीला फूल म्हणतां येत नाहीं. तसंच

फुलाला माती म्हणतां येत नाहीं. मातीचं फूल होत असतं हा आपल्याला सुलटा वाटणारा तेवढाच सृष्टिक्रम आहे असं नाहीं ! फुलांचीहि माती होत असते हा आपल्याला उलटा वाटणारा सृष्टिक्रमहि आहे ! दोन्हीहि क्रम एकसारखेच खरे आहेत ! मातीचं फूल होतं तेव्हां तें मातींतला जीवनरस शोषूनच फूल होत असतं; मग तें माती रहात नाहीं. आणि फुलांची माती होते ती फुलं सुकलीं, सडलीं, म्हणजे होते; मग तें फूल रहात नाहीं ! फुलांत अन् मातीत इतका फरक आहे ! आजच्या भांडवलशाही जगांत बेकार झालेल्या फुलमाळ्याचा लांकुडतोड्या होतो तेव्हां त्याचं मानवी सुमन सुकून, सडून माती होत असतं ! ( प्रकाश उठून फेऱ्या घालूं लागतो ) त्या मातींतून उद्यां फुलं उगवतील या विचारानें एखाद्या कवीला समाधान वाटत असेल, पण मातींत मिळून माती झालेल्या त्या माळ्याला ?– त्याला समाधान वाटण्यासारखं त्यांत काय आहे !

**प्रकाश**–( पटत असलें तरी हें विश्लेषण एकदम मान्य करीत नाहीं ) त्याला समाधानाला कांहींच जागा नाहीं ?

**गोविंद**–समाधानाला जागा ? आहे ना – नसायला काय झालं ! साऱ्या नरजातीला वानरांच्या अन् डुकरांच्या जातींत बसवणाऱ्यांना ' नर करणी करे तो नवकोट नारायण ' होऊन जाण्याचं समाधान असतं –अगदी तस्संच समाधान माकड झालेल्यांना माकडचेष्टेंत अन् डुकरांना नरकांत, समाधान असतंच ! नव्हे – तुमच्या म्हणण्याप्रमाणें त्यांनाहि समाधानाला जागा आहे– त्यांनीहि समाधान मानलं पाहिजे !

**प्रकाश**—भांडवलशाहीचं कांहींतरी अतिरंजित चित्र काढून तूं आपल्या संपाचं समर्थन करतो आहेस झालं !

**गोविंद**—अहो ! तुम्ही – अगदीं सत्प्रवृत्त, मानवतावादी कलावंत असलेले तुम्ही ! तुमचीसुद्धां आजच्या अराजकतेंत काय गत होऊं शकते याची तुम्हांला कल्पना नाहीं ! तुमच्यांत माणुसकीचा स्वाभिमान असेल तर तुम्ही देखील संपच कराल – डार्विनच्या माकडांत असते तितकीच माणुसकी तुमच्यांत उरली तर तुम्हीसुद्धां बेजबाबदार व्हाल – अन् तीहि उरली नाहीं तर तुमची गत उकिरडा उकरणाऱ्या डुकरासारखीच होईल, समजलांत ! तशी गत झाली म्हणजे मग मला सांगा तुम्हांला समाधानाला किती जागा आहे ती !

**प्रकाश**–चल ! आतां तूं कांहीं तरी बोलायला लागला आहेस ! माझ्यांत खरोखरच माणुसकी असेल– [ तर माझा माकड अन् डुक्कर ]–

**गोविंद**–( एकदम उसळून ) माणुसकी ! एक वेळ अशी येईल कीं तुम्हांलाहि माणुसकी परवडणार नाहीं – ( स्वर एकदम कमी करून ) पण तुम्हांला इतकं सहजासहजीं पटण्यासारखं खरोखरंच नाहीं हें – (एकदम कल्पनासुचल्यासारखा मोठ्यानें ) तुम्ही मला हें सांगा – तुम्ही चित्रकार झाला आहांत तें कशासाठीं ?

**प्रकाश**–( विचारपूर्वक संथपणें )मूर्त जगांत जो अमूर्त आशय मला आढळतो त्याची मूर्ति रंगवण्यासाठीं झालों – कां बरं ?

**गोविंद**–अन् पोटाची खळगी भरायला कांहीं ?

**प्रकाश**–नाहीं कसं ? मला प्रतीत झालेला आशय समाजापुढें मांडल्या-बद्दल समाजाकडून मोबदल्याची अपेक्षा मीं अर्थातच करतों.

**गोविंद**– आतां असं समजा कीं मी तुम्हांला म्हणालों – एखाद्या मूर्त अरबी घोड्यांत तुम्हांला जो अमूर्त आशय दिसत असेल त्याचं चित्र माझ्या मुलासाठीं तुम्हीं काढून द्या – तुम्ही काय कराल ?

**प्रकाश**– मोठ्या आनंदानें काढून देईन.

**गोविंद**– मोबदला ?

**प्रकाश**– तुझ्या मुलासाठीं फुकट काढून देईंन रे – केव्हांही काढून देईन !

**गोविंद**– तसं नव्हे – माझं लग्नबिग्न झालं नाहीं अजून – उदाहरण म्हणून आपण असं समजू कीं तुम्ही दिवसभर खपून काढलेल्या या चित्राचे दहा रुपये मागाल.

**प्रकाश**– कदाचित जास्त मागेन – कारण कित्येक दिवस बेकार रहावं लागतं, त्याचीहि तरतूद नको का करायला ?

**गोविंद**– बरं असं समजा कीं तुम्ही वीस रुपये मागाल त्या चित्राचे. अन् मग मी दुसऱ्या चित्रकाराकडे गेलों अन् तो तें चित्र पांचच रुपयांत काढा-यला तयार झाला तर ?

**प्रकाश**– काढून घे त्याच्याकडून !

**गोविंद**– तुमचीं बायकामुलं उपाशी मरत असलीं तरी तुम्ही असं म्हणाल ?

**प्रकाश**– आम्हीं उपाशीच मरत असलों तर काय ? मी चारहि रुपयांत काढून देईन तें चित्र !

**गोविंद**–अन् त्यानंतर तें चित्र घेऊन एखाद्या धनवंताला त्याच्या पोरा-साठीं वीस रुपयाला मी विकलं तर ? तुम्ही काय कराल ?

**प्रकाश**– मी करणार काय ? मला राग येईल तुझा !

**गोविंद**– कां बरं ? Demand and Supply च्या कायद्याप्रमाणं मी वागलों त्यांत तुम्हांला राग यायला काय झालं !

**प्रकाश**– ही फसवेगिरी नाही झाली ? माझ्या स्वाभिमानाला ही गोष्ट कशी रुचेल ?

**गोविंद**– वीस रुपयांचं काम चार रुपयांत करणाराला स्वाभिमान ! – राग ! कां हो ! अखेर राग येऊन कराल काय तुम्ही ?

**प्रकाश**– मी पुन्हां नाहीं काढून देणार तुला कसलंहि चित्र !

**गोविंद**– ( खूप जोरानें हंसून ) अहो ! म्हणजेच तुम्ही उत्पादन बंद कराल ! – संप कराल, संप ! ( थोडया वेळाने गंभीर होऊन ) कामगा-रांच्या चळवळीमागें जें राजकारण असतं तें याच स्वाभिमानाचं राजकारण असतं ! समजलांत ! तरीपण अखेर पोट जाळण्यासाठीं, सारा स्वाभिमान गाडून, दोन दमडयासाठीं कामगार जसा कामावर परत जातो तसंच तुम्हांलाहि नाइलाज होऊन पुन्हा माझ्यासाठीं चित्र काढणं भाग पडेल हें विसरतां तुम्ही !

**प्रकाश**–( हटवादीपणानें ) इतका नाइलाज झाला, अन् मला तुझ्या-साठीं कामं करणं भाग पडलं तर माझं मन मात्र त्या कामांत मुळींच लागणार नाहीं – अरबी घोडयाऐवजीं एखादा काबुली गद्धा काढून देईन मग मी तुला !

**गोविंद**–( विजयी मुद्रेनें ) अहो, म्हणजे तुम्ही अगदीं एखाद्या बेजबाब-दार उडाणटप्पूसारखे वागाल. ( प्रकाश कपाळावर हात मारून बसतो ) आणखी तुम्हांला ठाऊक नाहीं – तुमची मस्ती जिरवण्यासाठीं मी तुम्हाला काम देणंच बंद केलं तर काय होईल ठाऊक आहे ? ( जास्त जास्त गंभीर होत ) भिकार अन्न ! घाणेरडे कपडे ! रोगट जगणं ! एखाद्या पुलाखाली घर ! तिथंच संसार ! तिथंच सारे गृह्यसंस्कार ! ! – सारं समाधानच समाधान, नाहीं का ! ! ! हंः ! मातीतचि परि फुलें उगवतीं म्हणे ! ( एकदम

आठवण होऊन ) आज तुमच्याकडे आमचे मॅनेजर अन् तुमचे ते संपादक मित्र, कशासाठीं आले होते ठाऊक आहे? (प्रकाशचे डोळे विचारांचें काहूर माजल्यामुळें लाल झाले आहेत. भेदरल्यासारखा गोविंदकडे तो पाहतो) तुमच्या समाधानाचाच फ्रीझिंग पॉईंट मोजायला आले होते ते ! आमच्या लिथो प्रेसमधले अर्धपोटी आर्टिस्ट उद्यां संपावर गेले, तर मध्यंतरींच्या काळांत तुमच्याकडून जर एखादं निकडीचं काम काढून घ्यायचं असलं तर त्यांच्या मातीवर टाकायला किती थोडं पाणी तुम्हांला दिलं तर तुमचीं फुलं उगवूं शकतात अन् तुम्हांला समाधान होऊं शकतं हें अजमावयाला आले होते ते. समजलांत! ( प्रकाश पुन्हा दोन्ही हातांनीं कपाळ घट्ट धरतो)– अच्छा ! माझं चित्र रंगवायचं तुमचं काम संपलं का ?– माझं संपलं ! जातों मी माफ करा हं, उगीच त्रास दिला मी तुम्हांला ! ( जाऊं लागतो )

**प्रकाश**—( त्याचा चेहरा अगदीं असह्य वेदनांनीं लाल झाला आहे. तशा स्थितीत जोरानें हांक मारतो ) अरे ए ! जाऊं नकोस, पण जास्त बोलूं नकोस बाबा आतां – मला फार त्रास होतोय् – घेरी येईलसं वाटतंय् ! ( पुन्हा तोंड झाकून घेतो. गोविंद तत्परतेनें परतून त्याच्याजवळ जाऊन बसतो. शोभा घरांतून धांवत येते. तीहि त्याचें कपाळ धरते – पण त्यापूर्वींच पडदा – )

( अंक पहिला समाप्त )

# अंक दुसरा

(स्थळ – पहिल्या अंकाचेंच. पडदा बाजूला होतो त्या वेळीं स्टूडियोंत अंधार असतो. अर्ध्या एक मिनिटानें कॉलबेल वरचेवर वाजते. दहा पंधरा सेकंदांनी विगमधल्या जिन्यांत उजेड होतो. स्लीपिंग सूटमध्यें असलेला प्रकाश खाली उतरूं लागतो. जांभई देतो. पुन्हा कॉलबेल वाजते.)

**प्रकाश–** (जांभई संपतां संपतां) यस् – (स्टूडियोंतला दिवा लावतो. दार उघडतो. गोविंद एकदम प्रवेश करून स्वतःच दार लावतो. त्याचे कपडे आतां पूर्वीसारखे रंगानीं बरबटलेले नाहींत. पण वेष हाफ–शर्ट, फुल–पँट, वहाणा, डोक्याला कांहीं नाहीं असाच असतो. त्याच्या हातांत ब्रीफकेस आहे.) गोविंद, तुमच्या एकंदर कामांत कसलाच वक्तशीरपणा नाहीं, हें रे काय? आज चार दिवसांपासून तूं खातोस कुठें, झोंपतोस कुठें, याचा आम्हांला कांही पत्ता नाहीं – तुझ्यासाठी अन्न झांकून तरी किती दिवस ठेवायचं!

**गोविंद–**I am really very sorry. पण करायचं काय! आमच्या लढ्याचं टाइमटेबल आम्ही थोडंच आंखूं शकतों! डॉलर–स्टर्लिंगच्या तेजी मंदीत ज्या प्रमाणांत अराजकता माजेल त्या प्रमाणांत आमचं लढ्याचं टाईमटेबलहि उलथं–पालथं होत असतं – आमचंच काय, पण डॉक्टर, मास्तर, कारकून, छोटे मोठे दुकानदार – सगळ्यांचंच टाईमटेबल आतां टाइमस्केलशीं जुळेनासं झालं आहे-(घाईंत असल्यासारखा) बरं पण, तुम्ही झोपा आतां–आतां कुठें साडेपांच पावणे सहा वाजले आहेत -- मींहि झोंपतों थोडा आपल्या खोलींत – आज तीन रात्री झाल्या, या संपाच्या धामधुमीमुळं डोळ्याला डोळा लागला नाहीं माझा! (स्टोअररूमकडे वळतो)

**प्रकाश**— गोविंद, एक मिनिट थांब — मला तुझ्याशीं अगदीं जरूरीचं थोडं काम आहे. तूं एकदां घराच्या बाहेर पडलास म्हणजे केव्हां परतशील याचा तुझा तुलाच पत्ता नसतो —( मुद्याकडे वळून ) तुमचा संप सुरूं होऊन आतां आठ दिवस झाले – आणखी किती दिवस चालेल हा याचा कांही अंदाज आहे का तुला ?

**गोविंद**— त्याचा कांहीच नेम सांगतां येत नाहीं – अन् आतां तर हे हिंदू-बहार झगडे मालकांनी पेटवून दिले आहेत आणखी ! — कां ?

**प्रकाश**— सरकारी प्रचारखातयांत आर्टिस्ट म्हणून माझी नेमणूक होण्याचा संभव आहे.

**गोविंद**— ( चकित होऊन ) असं ?– लिथो प्रेसचा उदार आश्रय धुडकावून लावल्यानंतर सुद्धां ? तुमची नैतिक अवनति करण्यासाठीं चांगलेच हात धुवून मागें लागले आहेत तुमच्या, तुमचे हितचिंतक !

**प्रकाश**— हें पहा -- सरकारला चांगल्या आर्टिस्टची गरज आहे – तें आपल्या अन् लिथो प्रेसच्या भांडणांत कशाला पडेल ?

**गोविंद**— तरीपण कामगार अन् माझ्यासारखे देशद्रोही कामगार -- पुढारी तुमच्या घरांत धुडगूस घालीत असतांना -- [ तुमच्यासंबंधीं त्यांना सहानुभूति वाटावी हें आश्चर्य आहे. ]

**प्रकाश**—तेंच तर तुला सांगायचं आहे मला -- अन्तू म्हणत होता कीं तुम्हां लोकांचा अन् माझा या संपापासून जो अलिकडे संबंध जडला आहे तो तसाच राहिला तर मला ती नोकरी मिळणें कठीण होईल (गोविंद डोकें खाजवू लागतो ) कां विचार कसला करतोस ? अरे मला ती चांगल्या पगाराची नोकरी मिळाली तर कितीतरी आर्थिक मदत मी करूं शकेन तुमच्या चळवळीला, अन् जनतेला शिक्षण देतां येईल, कितीतरी जागृतिहि करतां येईल मला प्रचारखात्यांतून.

**गोविंद**—( जोरानें हंसतो ) तुमचं म्हणणं आलं माझ्या लक्षांत – ठीक आहे, सध्यां तुम्ही झोंपा आधीं. उद्यां उठल्यानंतर मी जागा ठरवतों माझ्यासाठीं दुसरी एखादी-पण उद्यांच्या उद्यांच -- [ मिळणं कठिणहि जाईल कदाचित् ] ( खोलीकडे वळतो )

**प्रकाश**—तू हंसलास कां तें सांग बरं मला ?

**गोविंद**—हं ! कां हसलों ! सत्याकडे स्वतः डोळेझांक करणारा माणूस दुसऱ्याला केवळ अहंकारामुळें सत्याचे धडे अगदीं शुद्ध हेतूनें शिकवीत असला तरी अखेर खोटं बोलून स्वतःला किती हास्यास्पद करून घेतो, याचं हंसायला आलं मला – बरं तर, गुड नाइट ! गुड मॉर्निंग रादर ! ( स्टोअररूमकडे वळतो )

**प्रकाश**–( थोडा चिडल्यासारखा ) हें पहा गोविंद, तूं असं कांहीं तरी बोलून माझ्या प्रश्नाचं स्पष्ट उत्तर द्यायच टाळतो आहेस !

**गोविंद**–आत्तांच कशाला दिलं पाहिजे तें ?

**प्रकाश**–मग तुझा five – year plan वगैरे आहे वाटतं!

**गोविंद**–( एकदम ध्यानांत आल्यासारखें ) असं असं – ही जागा सोडण्याबद्दल म्हणतां ? उद्यांच हालवतों मी माझ बिऱ्हाड कुठं तरी –

**प्रकाश**–( जास्त चिडून ) ते नाहीं रे ! तू हसलास का ते सांग –

**गोविंद**–तुमच्या शिक्षणाच्या अन् जागृतीच्या कल्पना किती कृत्रिम असतात ते पाहून हंसायला आलं मला. तुमचं तें शिक्षण अन् ती जागृति-डोंगऱ्यांच्या बालामृताची नुसती जाहिरात होईल ती ! तराजूच्या एका पारड्यांत एकच गलेलठ्ठ सपन्न शेटजी आहे अन् दुसऱ्या पारड्यांत सुकलेल्या हाडाचे अगणित विपन्न सांपळे आहेत अन् तरी त्या शेटजीचंच पारडं जड आहे ! वस्तुतः भांडवलदाराच्या अंगावर साचलेली चरबी कोणत्याहि ज्ञानामृताच्या प्राशनामुळें वाढलेली नसते – दुसऱ्या पारड्यातल्या असंख्य लोकाच्या अंगांतून ओरपून सांचवलेली असते ती ! पण भांडवलशाहीशीं मिळतं घेणाऱ्या सरकारची नोकरी करीत असतांना तुम्ही त्या हाडांच्या सांपळ्यांना कोणचं शिक्षण देऊ शकाल ? त्यांना खडबडून कसं जागं कराल ? "सत्य – अहिंसेचं ज्ञानामृत प्याल्यानें 'माणसे सशक्त होतात,' अशीच जाहिरात कराल ! पण भांडवलदारांच्या शोषणामुळें शुष्क झालेल्या आईचं जें अर्भक जन्माला आल्याबरोबर पांच मिनिटांच्या आत केवळ जगण्याचं त्राणं नाहीं म्हणून प्राण सोडतं त्याला कोणचं ज्ञानामृत पाजून जिवंत कराल ? त्याच्या आईला कोणतं सत्य सांगाल ? कोणती अहिंसा शिकवाल ? त्या अर्भकाची हिंसा कोणी केलेली असते ? त्या आईनीं ! ! पण तुम्ही तुमच्या ज्ञानामृताचे नळ मात्र नेमके तिच्याच घरांत नेऊन सोडाल !

**प्रकाश**-कां बरं ? जे परशोषणामुळें लठ्ठ झाले आहेत त्यांनाहि आम्ही शिक्षण देऊं, त्यांचंहि हृदय-परिवर्तन करूं ! ते ऐकणार नाहीत तर आम्ही उपास करूं ! सत्याग्रह करूं !

**गोविंद**-बंगालमध्ये उपासामुळें मेलेल्या लोकांच्या लक्षावधि प्रेतांचे प्रत्यक्ष ढीग पाहून ज्यांच्या हृदयाला धक्का बसला नाहीं, त्यांचं हृदय तुमच्या-सारख्या चारदोन लोकांच्या प्रवचनानीं अन् उपासांनीं बदलूं शकतं ! केवढा अहंकार आहे हा तुमचा ! तुम्हीच मेडिकल कॉलेजांत जाऊन कांहीं दिवस फिझिऑलॉजीचं अन् बायो-केमिस्ट्रीचं शिक्षण घ्या ! म्हणजे तुम्हांला कळेल कीं शेटजींच्या हृदयातलं रक्त शुद्ध करणारे रस तुमच्या सुपीक मेंदूंत उत्पन्न होऊं शकत नाहीत - झाले तर ते त्यांच्याच पोटांत उत्पन्न होऊं शकतात ! त्यांचं हृदय शुद्ध करायचं असेल तर त्यांच्याच पोटाला चिमटा घ्यायला हवा-तुमच्या डोक्याला अन् पोटाला ताण देऊन काहीं फायदा नाही - स्वतःचा अहिंसेचा हट्ट पुरविण्यासाठीं उगीच दुसऱ्यांना असत्य शिकवूं नका !

**प्रकाश**- मग मी ती नोकरी करूच नको म्हणतोस ?

**गोविंद**- तसं नाही म्हणत मी - ती नोकरी करा हवी तर, पण खऱ्याचा प्रचार अन् खोट्याचा पगार, याचा मेळ घालणं तुम्हांला जमणार नाही एवढं लक्षांत ठेवा - बरं तर, तुमच्या नोकरीचं तुम्हीं उद्यां पहा - सध्यां झोंपा बरं आधीं—

**प्रकाश** - (विंगमधील जिन्यानें विचार करीत जातांना) तो दिवा मालव हं, नाहीतर तसाच ढण्‌ढण् जळत ठेवशील अन् खुशाल झोंपशील. (जातो. जिन्यातला उजेडहि नाहीसा होतो. गोविंद त्यानंतर स्टुडियोमधील दिवा मालवतो आणि दरवाजा उघडतो. बळी एकदम प्रवेश करतो. तो बांध्यानें ठेंगणा ठुसका आहे. अंगात मळकट चेकचा शर्ट, पांढऱ्या रेघांची काळी तुमान, पायांत कांही नाहीं, असा त्याचा वेष आहे. )

**बळी**- ( आंत शिरतांच एकदम कुजबुजूं लागतो ) किती वेळचं वाट पहात ठेवलं जी तुम्ही मले बाहर छपरीमधी ! बाहर धामधूम बढून राहिली तसी माही केवढी सुटपुट होऊन राहिली होती !

**गोविंद**- ( कुजबुजतो ) अरे, माझा देखील अगदीं नाइलाज झाला. बरं, तूं इथें बस थोडा वेळ. मला अतांच एक जरूरीचं पत्र मिळालं आहे.

तेवढं त्या खोलीत जाऊन वाचून घेतों आधी – तोंपर्यन्त थांब इथंच. (स्टोअर रूममध्यें जातो. त्या खोलीतला दिवा लावतो. तो जवळजवळ एक मिनिट-भर बाहेर येत नाहीं. त्यामुळें बळी अधीर होऊन चुळबुळ करीत असतो हें बळीच्या छायेवरून दिसत असते. अखेर तो कंटाळतो )

**बळी**–( त्रासलेल्या पण हलक्या आवाजात ) का करून राहिले जी तव्हाचे ? (विंगमधल्या जिन्यानें हलक्या पावलांनी शोभा येते, व या नवऱ्या माणसाचें कुजबुजणें ऐकून हळूच खाजगी खोलीच्या दरवाज्यांत शिरते व पडद्यामागून पहात उभी राहते. स्टोअर रूमचा दिवा विझवून गोविंद बाहेर येतो. स्टुडियोंत पूर्ण अंधार असतो, पण दिवस उजाडत असतो तसतसा ग्राऊंड–ग्लासच्या भिंतीतून उजेड वाढतांना दिसतो. )

**गोविंद**–( बाहेर येताच बळीजवळ जाऊन बसतो ) हं, तूं मला आतां हें सांग, काय भानगड झाली ? तू त्या मिलच्या फाटकावर तितक्या लोका-समोर कां म्हणून मारलंस.त्या गुडाला ? तुला ठाऊक नाही, आज मालकांनीं मिल चालू करायचं ठरविलं आहे, तेव्हा गडबड होणार – एखादे वेळीं पोलीस गोळीबारसुद्धां करायचें – अन् तू काही एक विचार न करतां त्याच वेळीं मारामारी केलीस ! याचा परिणाम किती भयंकर होईल याचा काही विचार !

**बळी**– माह्या नवरीवर त्या भडविच्यानं त्या दिवशीं हात टाकला भर सडकीवर – अरे आम्ही महार झालो आमच्या आयाबहीणीतले काही इज्ज-तच नाही का जी ?

**गोविंद**– इज्जत नाही असं कोण म्हणतो ! पण तुला सूडच घ्यायचा होता तर दुसरी जागा नव्हती ? तुला तीच जागा सांपडली ! थोडा विचार नको करायला ?

**बळी**– त्यानं माह्या नवरीवर हात टाकला त कोनता इचार केला थे त सांगा !

**गोविंद**– (थोडें दरडावून) हें पहा, तुला एखाद्याचा जीव घ्यायचा असेल अन् आपला द्यायचा असेल तर कर काय हवं तें – पण तुला हें कसं समजत नाहीं – त्या मिलच्या फाटकावर तूं त्याचा जीव घेतलास अन् उद्यां कोर्टानीं तुला फांशी देऊन तुझा जीव घेतला म्हणजे संपलं ! सगळ्या

कामगारांच्या संपावर तुझ्या या वागण्याचा काय भयंकर परिणाम होईल याचा कांहीं विचार !

**बळी**—तुम्ही लोक मोठ्या लंब्या गोष्टी करत राहयता जी ! उद्यां कामगाराहिचं राज येईल म्हनता — पन आज होऊन राहिले हे हिंदू — महार झगडे अन् आमच्या आयावहिनीची बेइज्जती — थे त बंद नाहीं करूं शकत !

**गोविंद**—कशी बंद करणार ? अन् काय काय बंद करणार ! बेइज्जती ! बरबादी! पिळणूक ! लढाया !—हें सारं कोण बंद करणार ! मी ! तुमच्या-वर — कामगारावरच जबाबदारी आहे ती ! गुंड लोकांना अन् त्यांच्या पोशिंद्यांना तुम्ही लोकच दुरुस्त करूं शकतां — खरी एकी प्रथम कामगारां-चीच होऊं शकते हें त्यांना माहीत आहे—तुमची एकी झाली कीं आपलें दिवस भरले हें साऱ्या लफंग्यांना ठाऊक आहे — अन् म्हणून तर तुमच्यांत फूट पाडून तुमची सारी ताकद असे रक्ताचे पाट फोडून खतम् करायच्या ते मागे लागले आहेत — हें सारं ओळखायचं सोडून डोकं फिरल्यासारखे तुम्हीं वागतां, अन् त्यांच्या या नीतीला उलट हातभार लावतां !

**बळी**—हं, ( क्षणभर विचार करतो — पण एकदम लक्षांत आल्यासारखा ) बरं पन् आतां पुढं कसं ? दिवस फाकत चालला ना — येथवरी त आनलं तुम्ही मले — पन् येथसा कसा राहू जी ? घरमालक राहू देईल मले ?

**गोविंद**—घरमालक कसाहि असला तरी बाई मोठी मर्द आहे — ती धोका नाहीं देणार ! ( इतक्यांत बुटांचा आवाज ऐकूं येतो ) का रे ! पोलिसांना सुगावा लागला का रे आपण इथें आलों याचा ?

**बळी**—कोन जाने ! ऐसी तैसी काहुन नाहीं होत या पोलीसवाल्याहिची !

**गोविंद**—पण ते इथे आले तर आयतेच सापडूं आपण त्यांच्या तावडींत (घाईघाईनें ) तूं असं कर — तूं इथंच थांब — मी जरा पाहून येतों बाई जागीं असेल तर ( जिन्याकडे वळतो )

**शोभा**—(पडद्याबाहेर एकदम येऊन कुजबुजते) तूं बोलूं नकोस — मला समजलं आहे सगळं. ( बळीला ) तू असं कर — तूं त्या जिन्याखालीं लपून रहा-- अन् तूं ( गोविंदाला ) आपल्या खोलींत जा. मी माडीवर जाते. पोलीसांनीं घंटी वाजवली कीं साहेब खालीं येतील दार उघडायला — त्याबरोबर तूं

( बळीला ) हळूंच माडीवर ये – तिथून सज्ज्यांतून पलीकडे पळून जायची वाट दाखवीन मी तुला.

**गोविंद**—हें एवढं पत्र जपून ठेवाल कां आपल्याजवळ ? ( देतो )

**शोभा**-आण इकडे ( पत्र घेऊन ब्लाऊजमध्यें लपविते व माडीवर जाते. ) ( बळी व गोविंद ठरल्याप्रमाणें आपापल्या जागी जातात. १०–१५ सेकंदांनी दारावर आधीं थाप वाजते – त्यानंतर कॉलबेल – पांचदहा सेकंदानीं प्रकाश डोळे चोळत खालीं येतो, दार उघडायला वळत असतांनाच पुन्हा घंटी वाजते – थाप वाजते – या गडबडीत बळी विंगमधल्या जिन्यानें हळूच चालता होतो. )

**प्रकाश**– य ऽ ऽस् ( स्टुडियोंतला दिवा लावतो व दार उघडतो. दार उघडतांच पोलीस इन्स्पेक्टर व एक कॉन्स्टेबल प्रवेश करतात. )

**पो. इ.**—( थोडचा करारी आवाजांत ) एक फरारी गुन्हेगार या घरांत येऊन लपला आहे असं आम्हांला कळलं आहे – तुमचं काय म्हणणं आहे?

**प्रकाश**– ( चकित होऊन ) फरारी गुन्हेगार ! म्हणजे गोविंद फरारी गुन्हेगार आहे ? – तो आला बुवा आत्तां एक दहा मिनिटांपूर्वी !

**पो. इ.**– कोण गोविंद ? कुठे आहे तो ?

**प्रकाश**– ( स्टोअररूमकडे वळून ) अरे गोविंद !

**पो. इ.**– जरा थांबा – या घराला बाहेर जाण्यायेण्याचे दरवाजे किती आहेत ?

**प्रकाश**– हा एवढाच !

**पो. इ.** – जवान ! यहां खडे रहो और ख्याल रख्खो.

( कॉन्स्टेबल एकदम 'अटेन्शन' होतो. पो. इ. व प्रकाश स्टोअररूममध्यें जातात. कॉन्स्टेबल भिंतीवरील चित्रें अनावर जिज्ञासेनें पाहूं लागतो. १०–१५ सेकंदानंतर प्रथम प्रकाश, नंतर गोविंद व सरतेशेवटी पो. इन्स्पेक्टर बाहेर येतात. कॉन्स्टेबल एकदम 'अटेन्शन' होतो. )

**पो. इ.**–तुम्ही केव्हां आलांत इथें ?

**गोविंद**—१०–१२ मिनिटांपूर्वी.

**पो. इ.**- तुमच्याबरोबर किंवा त्यानंतर बळी महार आला या इथं ?

**गोविंद**—कोण बळी महार ? माझ्या पाहण्यांत कोणीच आलं नाहीं.

**पो. इ.**–तुम्ही लिथो प्रेसच्या संपाचे पुढारी आहांत नाहीं का ?

**गोविंद**––तें ठरविणं माझं काम नाहीं. मी लिथो प्रेसमधें काम करणारा कामगार आहे.

**पो. इ.**– That's enough ! जवान, ख्याल रक्खो – ( कॉन्स्टेबल अटेन्शन ' होतो ) तुम्ही या इथंच बसून रहा. ( गोविंद खुर्चीवर बसतो. पो. इ. व प्रकाश ' खाजगी ' खोलींत जातात. )

**गोविंद**—( हलक्या आवाजांत ) क्यंव जवान, क्या गडबड है ये ?

**पो. कॉ.**–अजी थोडी देर हुई – मिल के फाटक पर कुछ मजदूर पिकेटिंग कर रहे थे और कुछ मजदूर कामपर जाने को कहते थे–थोडी देर गरमा-गरमी की बातें होती रहीं – इतने में एक महरे ने एक कामगार के सिरपर लाठी चलाई और साला भाग गया.

( पो. इ. व प्रकाश बाहेर येऊन ' विद्यार्थी ' खोलींत जातात. तोपर्यंत गोविंद व पो. कान्स्टेबल स्तब्ध असतात. ते अदृश्य होतांच )

**गोविंद**–क्या, बहोत मार लगा है उसको ?

**पो. कॉ.**–अजी बहोतहि घायल हुवा वो – मै नहीं समझता वो फिरसे सांस लेगा !

**गोविंद**–और वो मेहेरा ? उसका पता नहीं चला अभीतक ?

**पो. कॉ.**– जी नहीं, लेकिन कुछ कामगार कह रहे थे की वो इसी तरफ आया.

(पो. इ. व प्रकाश पुन्हा बाहेर येतात व वरच्या मजल्याच्या जिन्यानें वर जातात. ते अदृश्य होतांच)

**गोविंद**– लेकिन आप लोग खास इसी घरमें कैसे आ पहुंचे ?

**पो. कॉ.**– इस बंगले में मजदूर लोगों कीं मीटिंग हुवा करती है ऐसा हमें पता चला है.

**गोविंद**– (आश्चर्य व्यक्त करीत) अच्छा ! लेकिन उसका ठिकाना यहां नहीं लगा तो ?

**पो. कॉ.**– करते रहेंगे इधरसे उधर और उधरसे इधर दौडधूप ! – हमारा तो खानापीना, हगनामूतना सब बंद हो गया इन झगडों के मारे ! साली झगडोंकी तो हद हो गई– हिंदू–मुस्लिम झगडे ! हिंदू – महार झगडे !

बम्हन–बमनेतर झगडे ! मालिक – मजदूर झगडे ! – काला बजार ! हात भट्टी –! धत् इसकी बहिन इन झगडों की ! अंग्रेजी राज था तब भी झगडे ! और अब सौराज आया तो भी झगडे ही झगडे !

( पो. इ. व प्रकाश खालीं उतरून विगच्या जिन्यानें जातात. ते जातांच )

**गोविंद**– तो आप लोगों की बडी बुरी हालत होती होगी इन झगडों के मारे !

**पो. कॉ.**– 'अब क्या बताएँ हमारी हालत !

**गोविंद**– लेकिन् आखर आपहि लोगों को तो ये झगडे मिटाने पडते है !

**पो. कॉ.**– अजी क्या कह रहे है आप ! हमारे बाप से नही समलेगी यह बुरी हालत ! अब तो पुलीसवाले और फौजवालें भी हडताल करनें लगे हैं ! अपने अपने पेट के लिये सबही मर रहे हैं !

**गोविंद** – फिर भी आप लोगों की जिंदगी तो कम से कम रुआब और शान से बसर होती है ! – [ हमारे जैसे लोगों की हालत ]

**पो. कॉ.** – ( त्याच्या अज्ञानाची कींव करून ) रुआब और शाब ! ! अजी इनिस्पेक्टर जर्नेल एक लात देता है कप्तान सहाब को, और कप्तान सहाब उसमें अपनी एक मिलाकर देते है दो सर्कल साहाब को – सर्कल साहाब उसमें अपनी एक मिलाकर देते है तीन दरोगा साहाब को–और उसी तरह दरोगा साहाब हमको देते है चार–और गिन्ते है एक ! – क्या कहनी है हमारे रुआब और शान की! – ऊपरसे खाओ लाता, और लोगों की भी सुनो गालीगुफ्ता ! हम लोगों को तो दुनिया में चारों ओर हमारे दुश्मनहि दुश्मन दिखाई पडते है ! (पो. इ., प्रकाश व शोभा खाली उतरतात. पो. कॉ. पुन्हां 'अटेन्शन' होतो )

**पो. इ.**–जवान ! चलो बाहार एकदम् ! फरारी का और तलाश लगाना होगा. ( जातात. पण जाण्यापूर्वी स्टूडियोंत संपासंबंधीचे कांही पोस्टर्सं पडले असतात त्यांतले एकदोन उचलून नेतात. पो. कॉ. पो. इ. ची नजर चुकवून तिघांना सलाम करून जातो )

**शोभा**—( पो. इ. व पो. कॉ. बाहेर गेलेले पाहून दार लावून घेते ) गेली ब्याद एकदांची ! मला वाटलं तुला तरी नेणार ते पकडून, दुसरं कोणी नाहीं तर !

**प्रकाश**– अन् त्यांनीं ते पोस्टर्स उचलले तेव्हां मला तर वाटलं, आली आपल्यावर गदा आतां ! कशासाठीं घेऊन गेले ते आपल्या बरोबर !

**शोभा**–बरं तुम्ही चूळबिळ भरा बरं आतां – चहा करत्यें मी.

**गोविंद** - पण माझ्यासाठीं करूं नका हं – मी बाहेरच चहा घेईन – मला ताबडतोब बाहेर गेलं पाहिजे–बाहेर परिस्थिति जास्त चिघळण्याचा संभव आहे आतां.

**प्रकाश**–आतां तूं कशाला जातोस बाहेर मरायला ! – धामधुमींत सांपडून जीव द्यायचा आहे वाटतं !

**गोविंद**–अहो, पण अशाच वेळीं तर आमची खरी गरज असते – शिवाय माझ्या इथं राहण्यामुळं तुम्हांलाहि धोका आहे यापुढं ( जाऊं लागतो )

**शोभा**–( अधिकार वाणीनें ) गोविंद !

**गोविंद**– खरंच मला माफ करा ! – please ! (दार उघडून जातो)

( प्रकाश त्या दिशेकडे सुन्न होऊन ४–५ सेकंद पहात असतो, नंतर विंगमधल्या जिन्यानें जातो. शोभा दार आंतून लावून घेते व ब्लाउजमधील पत्राची तिला आठवण होतांच तें चटकन् काढून वाचूं लागते. तिचें वाचन चालूं असतांना तिचा चेहरा गंभीर होत जातो. एक भाग ती पुन्हां पुन्हां वाचते. त्या सुमारास घंटी वाजते. त्याबरोबर तें ब्लाउजमध्यें पुन्हा लपवून ती दार उघडते – गोविंद, बाबू व जंगलू प्रवेश करतात. बाबू कोंवळा दिसणारा २२।२३ वर्षें वयाचा आहे. त्याच्या अंगांत काळ्या रंगाचा अधिक काळा झालेला हाफशर्ट व निळ्या रंगाची काळी झालेली पँट आहे. पायांत वहाणा. जंगलू राठ धोतर नेसलेला, मळकी गांधी टोपी व मळका हाफशर्ट घातलेला अगदीं राकट दिसणारा २७।२८ वर्षें वयाचा सटरफटर कामें करणारा कामगार दिसतो. बाबूच्या हातांत 'ज्ञानदीप' आणि 'नया संसार' अशा दोन साप्ताहिकांच्या एकत्र मिळून काढलेल्या जोड अंकाच्या दोन प्रती आहेत. दोन पृष्ठें 'ज्ञानदीप' आणि दोन पृष्ठें 'नया संसार' अशी त्यांची छपाई आहे. )

**शोभा**–( त्या तिघांना पाहून ) हे रे काय ? ( दरवाजा उघडतांच बाहेर चाललेला गलबला ऐकूं येतो. त्याला उद्देशून ) अन् बाहेर गडबड कसली चालली आहे एवढी ?

**बाबू**–पोलीसांनीं लाठीहल्ला केल्यामुळं कामगारांची धांवपळ मचली आहे. धरपकडहि सुरूं केली आहे त्यांनीं. आम्हीं गोविंदला अगदीं जबरदस्तीनं इथं आणलं नसतं तर तो त्या गडबडींत खात्रीनं पकडला गेला असता. (गोविंदला उद्देशून ) आतां बसा महाराज थोडा वेळ इथंच. आमचे संपादक महाराज काय काय म्हणताहेत ते तरी पाहूं ! दोन मालकांची एकजूट झाली आहे म्हणतात या जोड अंकांत, कामगारांविरुद्ध !

( प्रकाश पांढरा शर्ट आणि पांढरा पैजमा घालून विंगमधील जिन्यानें उतरत येतो. त्याला पाहून शोभा ' खाजगी ' खोलीत जाऊं लागते.)

**शोभा**—आतां बाहेर जाऊं नका रे कोणी. चहा करतें मी सगळ्यांसाटीं.

**जंगलू**–बाई थोडं खायले भी आना कांहीं शिळं पातं असन त – भूक मोठी लागली लम्ची !

**शोभा**—बरं बरं आणत्यें – बसा जरा स्वस्थ आतां. ( जाते )

**प्रकाश**–कायरे जंगलू, बाहेर बरीच गडबड चाललेली दिसते आहे !

**जंगलू**—मोठी धूम मचली जी !

**बाबू**–मिलच्या फाटकापाशीं हिंदू–महारांची मारामारी झाली, तेव्हां पोलिसांनीं केला लाठीहल्ला – साऱ्या कामगारांची आतां पांगापांग झाली आहे. पहारा बसला आहे आतां मिलच्या फाटकावर – मला वाटतं मालक आतां ताळा ठोकणार आजपासून मिलला !

**जंगलू**–आपुन त तंग झालो भैया आतां – आतां त माही नवरी भी बेमार पडली जी ! नाही त ते जाय अन् आने हरारी टांगेवाल्याहिसाठीं – रोजी कसे भी आठ दहा आने होत राहेत – मीनं त आता पोट्ट्याले सांगतलं – चोऱ्या करत जा बेटा आता !

**प्रकाश**–तुमच्या छापखान्यांचा संप काय म्हणतो ?

**बाबू**–आमचा संप ! हा जोड अंक काढला आहे ना दोघां मालकांनीं मिळून दोन्ही साप्ताहिकांचा ( दोन दोन पृष्ठें दाखवतो ) हा आमचा 'नया संसार' अन् हा जंगलूचा ' ज्ञीनदीप ' ( जंगलूला ) पाहिली आपल्या मालकांची हिंदी–मराठी एकजूट ! दोन मँटलची ग्यासबत्ती झाली आहे आतां ही ! पण कामगार संपावर गेल्यामुळें तेल बंद झालं बत्तीतलं ! आतां किती दिवस हवा भरून पेटते ती पाहूं त ! तुझा संपादक हवा भरतो–

'कामगारांच्या काळ्याकुट्ट कारवाया' ( प्रत्येक 'का' वर जोर देतो ) अन् माझा मालक हवा भरतो –' छापखाने के छाती में छुरी !' (प्रत्येक 'छा' व 'छू' वर जोर देतो. एक अंक प्रकाशला देतो व दुसरा गोविंदपुढें करतो )

**गोविंद**–वाच वाच. तूं वाचून घे आधीं ! ( जंगलूला ) तूं खुपसलीस का रे तुझ्या छापखान्यांच्या छातींत सुरी ?

**जंगलू**—मी काहचले जाऊं जी छापखान्यांत ?–चिठ्ठ्याचपाट्या पोचवत राह्यतो इकडून तिकडं !

**प्रकाश**–( अंक चाळून ) हें काय ! 'ज्ञानदीप' च्या एका पानावर तर नुसती जाहिरातच आहे, 'नवजीवन दवाखान्या' ची ! अन् 'नया संसार' च्या एका पानावर पानभर चहाची जाहिरात ! अन् किंमत किती?–दोन आणे ! शाबास ! !

**बाबू**–तें सगळं ठीकच ठीक आहे ! चहाच्या जाहिरातीचं कंपोझिंग करावचं लागत नाहीं -- तेव्हां माझं कामच उरलं नाहीं. जाहिरातीचं बिलहि येतं चांगलं अन् आमच्या संपादक महाराजांना चहाहि मिळतो कधीं कधीं ! 'ज्ञानदीप' ची गोष्टहि तीच ! 'नवजीवन दवाखान्या' ची नेहमींच येणारी जाहिरात आहे ती – तिचा कंपोज डिस्ट्रिब्यूट केला नसेल – तीच दिली ठोकून याहि अंकांत !

**प्रकाश**–का रे बाबू ! या 'नवजीवन दवाखान्या' च्या जाहिरातीचं सुद्धां बिल चांगलंच येत असेल, नाहीं ?

( गोविंद बाबूजवळून अंक काढून घेतो )

**बाबू**–'नवजीवन दवाखाना' ! तो तर खरा अन्नदाता आहे 'ज्ञानदीप' चा ! इतकंच नाहीं, तर त्याचे संपादक राजकारण देखील त्याच दवाखान्यांत शिकले !

**गोविंद**– ( अंक वाचतां वाचतां बाजूला करून ) ए बाबू, पुरे कर रे तुझी ती कोटी ! –

**प्रकाश**– काय, काय, कसली कोटी ?

**बाबू**- ( उत्तेजित होऊन प्रकाशच्या हातांतला अंक काढून घेतो व त्यांतील मजकूर दाखवीत ) याच्यांत कसं लिहिलं आहे–जुन्यांत जुनी कसलीहि कमजोरी या जवानमर्द मोदकांच्या सेवनानें अशी नष्ट होते जसे हवेनें

मच्छर ! कधींकधीं तर ताकद इतकी वाढते कीं तिच्यावर उतार घ्यावा लागतो ! त्यानंतर हें दुसरं औषध–'गोष्ट तर होऊन गेली! – आतां गुपचुप!' बेचाळीस सालपासून 'ज्ञानदीप'च्या संपादकांनीं आपलं राजकीय धोरण नवजीवन दवाखान्याच्याच चालीवर बसवलं आहे! प्रथम क्रांति! ऑगस्ट क्रांति!! क्रांतीचे जवानमर्द मोदक ! ! – हिंदुस्थानांतील नामर्द जनतेला खूपच खाऊं घातले यांनीं–पण ते मोदक खाऊन जनतेची जवानी इतकी वाढली कीं मग 'अहिंसात्मक क्रांती'चा उतार त्या जनतेला यांनीं द्यायला सुरुवात केली--तरीपण कांहीं लोकांच्या हातून क्रांतीची गोष्ट तर होऊन गेली--त्यांना गुपचुप! –आतां गुपचुप करायच्या मागें लागले आहेत ते ! मिळून काय--'ज्ञानदीप'च्या क्रांतीचा नवजीवन दवाखाना जोरांत चाललाच आहे कांहीं झालं तरी !

**प्रकाश**– शीः ! कांहीं तरी अश्लील अन् घाणेरड्या गोष्टी करतां तुम्हीं लोक !

**बाबू**– घाणेरड्या गोष्टी ! हें सर्व छापून त्यावर पैसे मिळवणं, तें घाणेरडं नाहीं – अन् आमची गोष्ट तेवढी घाणेरडी !

**जंगलू**– (पुढें सरसावून) हें असं लेहलं आहे का जी यामधी ? माहा पोरगा लेहनं शिकते – त्या बटयानं वाचलं हे एक दिवस अन् मले का म्हने- – 'बाबा मले घेऊन दे न मोदक खायले' पोट्टयानं मोठी जिद धरली त मीनं म्हनलं 'चाल' अन् त्यास पुसलं कोठं भेटतेत थे – त्यानं वाचला पता- मोठा हुशार झाला रम्चा – अन् घेऊन गेला मज तेथसा. मीनं म्हनलं देऊन टाका जी दोन मोदक – त त्या महासाळ्यानं इलुश्या दोन गोल्या देल्ल्या अन् का म्हने – एक रुपया टाक ! मीन फेकल्या त्या त्याच्या आंगा- वर अन् एक रहेपट देल्ली पोट्टयाले मी ! का का छापतेत छापनेवाले भी– वाः ! मोदक, वारे मोदक !

(सगळे हंसतात. इतक्यांत कॉलबेल वाजते. प्रकाश दार उघडतो. अन्तू प्रवेश करतो. प्रवेश करतांच कामगारांचा घोळका पाहून चिडल्यासारखा दिसतो. )

**अन्तू**–पोलीसनीं झडती घेतली या इथं ?

**प्रकाश**—अंः ! त्यांना आमच्या इथं कोणी फरारी गुन्हेगार लपला आहे असं वाटलं म्हणून आले होते ते–पण इतक्या पहांटे तूं कसा आलास इकडे ?

**अन्तू**—( खोचून ) साऱ्या शहराला आज पहांटेपासून कामगारांनी आग लावली आहे हें तुला ठाऊकच नाहीं जसं !

**प्रकाश**--बरं बरं ! तू बस तर आधीं. आतांशा तू असा एकेरीवर काय यायला लागला आहेस एकदम !

**अन्तू**--तुमच्यासारखे दुहेरी डाव खेळण्यापेक्षां एकेरीवर आलेलं फार बरं ! ( हातपाय थरथर कांपू लागतात )

**गोविंद**--( अन्तू बसत नाहीं हें पाहून आपली खुर्ची पुढें करून सलगीनें) अहो बसा तर आधी– उभे किती वेळ राहणार तुम्ही असे ?

**अन्तू**-( त्यालाहि न मानतां ) आता तुम्ही तर घरमालकच झालेले दिसतां, येणाऱ्या जाणाऱ्यांचं आदरातिथ्य करायला !

**प्रकाश**-( त्याचा हात धरून त्याला खुर्चीवर बसवीत ) अरे मी करतो तुझं आदरातिथ्य — मग तर झालं ! शोभे–ए शोभे !

**शोभा**-( पडद्यांतून डोकावून ) काय गडबड आहे ? ( अन्तूला पाहून तिची मुद्रा उग्र होते )

**प्रकाश**-अग, एक कप चहा यांच्याहिसाठीं आण, बरं कां ?

**शोभा**( पाठ फिरवून परत जातां जातां तुटकपणें ) आणत्यें !

**अन्तू**-( जंगलूकडे पाहतांच एकदम उसळल्यासारखा ) कां रे जंगलू, परवां संध्याकाळी मिनिस्टर साहेबांचा चपरासी आला होता, त्याला द्यायला तुझ्याजवळ मी चिठ्ठी दिली, ती दिलीस तूं त्याला ?

**जंगलू**--देल्ली नाहीं त का !

**अन्तू**--( दरडावून ) खोटं बोलू नकोस !

**जंगलू**-मी काहुचले खोटं बोलू जी ! मी काहुचले ठेऊं ते आपल्या-पाशी ! मले का लेहनं येते का पुसनं येते !

**अन्तू**—बेरडासारखं उत्तर देतोस आणखी !

**जंगलू**-( बेफिकीरपणें ) अरे वा ! नोकर झालो म्हूनशान् कुठं भी चार चौघासामने दम भरतां का जी मले !

**अंतू**--( प्रकाशला ) पाहिलंस ! - किती शेफारले आहेत हे, तूं आपल्या तोंडीं लावल्यामुळं ! काल संध्याकाळीं मला फोन आला होम मिनिस्टरचा - पत्राचं उत्तर कां नाही पाठवलं म्हणून ! ह्यानं त्याच्या

ऑर्डलीला सांगितलं कीं कांहीं जवाब नाहीं म्हणून ! मधल्यामधें पत्रव्यवहार देखील दाबायला लागले आहेत हे आतां ! – अन् तूं यांना शेल्टर करतोस !

**गोविंद**–( अगदीं संथपणें ) अहो, त्या ऑर्डलीच्या हातून सुद्धां गहाळ झालं असेल तें कुठं तरी – अन् तोच थापा मारीत असेल ! काय, फार महत्त्वाचं होतं कां तें ?

**अन्तू**–Please mind your own business ! साऱ्या देशांत अराजकता माजवली आहे तुम्ही बेजबाबदार लोकांनीं – कामगारांचे पुढारी झाले आहेत मोठे ! ( प्रकाशला ) I really pity you ! तुला आतां कसलीहि sense of propriety राहिली नाहीं – कोण लोक आहेत हे ? कोण लागतात हे तुझे ? ( जगलूकडे पहात ) कशासाठीं जवळ केलं आहेस तूं हें मॉडेल ?

**जंगलू**–( आतां तो बेपर्वा झाला आहे ) काहुन जी ! भले काहुन मढेल म्हनता, अँ ?

**अन्तू**–damn his face !

**जंगलू**–(त्याचा राग अनावर झाला आहे) साहेब ! फेस निघल तुमच्या तोंडांतून, समजले !

**गोविंद** } ऐक रे जंगलू !
**प्रकाश** } तू चूप बस बरं जंगलू ! (अन्तूला) अन्तू, जरा शांत हो बरं – काय भानगड काय आहे ती तर सांगशील मला !

**अन्तू**–आधीं या विश्वासघातकी पशूंना हाकल इथून !

**प्रकाश**–(थोडा गंभीर होऊन) अन्तू – This is too much, हं – काय घात केला या लोकांनी – कुणाचा विश्वासघात ?

**अन्तू**– साऱ्या शहराचा ! – साऱ्या देशाचा ! अन् तूं मला तोंडभर विचारतोस कोणाचा विश्वासघात केला म्हणून ! !

**गोविंद**– (मधें पडून) अहो देशभक्त ! कोणाचा देश ! कोणाचं शहर ! ! पशूंनाहि देश असतो ! ! !

**अन्तू**–( वादांत जिकण्याच्या अहमहमिकेनें ) पण त्या पशूंचंच तर साऱ्या जगांवर राज्य स्थापन करण्याचे बेत चालले आहेत तुमचे ! ज्यांना

कसलीहि शिस्त नाहीं, ज्यांना सडकेवरून नीट चालतांसुद्धां येत नाहीं, शिवीशिवाय एक वाक्य ज्यांना बोलतां येत नाहीं, ज्यांना कोणाच्याहि आया-बहिणीबद्दल आदर नाहीं, कसलीहि संस्कृति नाहीं, पावित्र्य नाहीं, माणुसकी नाहीं – त्यांचंच राज्य स्थापन करणार आहांत ना तुम्ही !

**गोविंद–** इतके भयंकर आहेत ना हे पशू ! मग त्यांचीं माणसं बनवा कीं! माणसं पशूसारखीं वागतात तोपर्यन्त माणुसकीचं राज्य स्थापन होणं शक्य नाहीं हें आम्हांला तुमच्यापेक्षां जास्त चांगलं कळतं, समजलांत ! पण तुम्ही! त्यांना माणसांत आणण्याचें आमचे प्रयत्न हाणून पाडून त्यांची नीचाहून नीच डुकरं बनवण्यांत राक्षसी आनंद मानता ! -- तुमच्या छापखान्यांतला हा जंगलू – तुमचे कंपॉझिटर्स, तुमचे मशीनमन – माणूस म्हणन ठेवले आहेत तुम्ही आपल्या छापखान्यांत ! तुमचे लेख, व्याख्यानं, मुलाखती छापा-यचीं अन् वाटायचीं नुसती यंत्र समजतां तुम्ही त्यांना ! ! हजारों मण तेल गाळणाऱ्या घाण्याला तें चालण्यापुरतं ओंगण म्हणून त्यांतलेच तेलाचे चार थेंब देतां तुम्हीं ! घाणा चालला तोंपर्यन्त वापरला – झिजला, नाहीं परवडला कीं स्क्रॅप केला ! अन् असल्या यंत्राला संस्कृति नाहीं, पावित्र्य नाहीं माणुसकी नाही – यंत्राला माणुसकी नाहीं – म्हणून तुम्हीच उलटया बोंबा मारतां ! वरून शुभ्र खादी पांघरली म्हणजे ज्या समाजव्यवस्थेंत सारीं कृष्णकृत्यं पचवतां येतात तिथं कोणता असंतुष्ट माणूस घाईस पेटून पशू बनणार नाही ! ( 'ज्ञानदीप' चा अंक पुढें करून ) कामगारांच्या काळयाकुट्ट कारवाया म्हणे ! – प्रासानुप्रासाचे पोकळ अलंकार चढवून नवकोट नारायणांच्या दरबारांत त्यांची खुषमस्करी करायचं सोडून राजकारणात कशाला लुडबुडतां उगीच ! (वाचून दाखवतो ) 'ऑगस्ट क्रांतीच्या पाठीत खंजीर खुपसणारे कामगार' ! ! तुमचे, तुमच्या भावा-बहिणींचे, बहिणींच्या सासऱ्याचे, काकाचे, सगळ्या नातलगांचे आपमतलबी मळे पिकविण्यासाठीं आपल्या रक्ताचं खत घालायला कामगार म्हणजे बकरेच आहेत कीं नाहीं !

**जंगलू–** ( मधेंच केंविलवाणें तोंड घालून ) हो नाहीत का जी ! समदेच पुऱ्हाडी आम्हांस कुत्रें समजूनसन्या दिवसरात इकडून तिकडं अन् तिकडून इकडं

छू ले ! –छू ले ! –करत राहयतेंत – कोना-कोनाचं आयकावं आम्हांस त समजेच नाही !

**बाबू**—( प्रकाशला उद्देशून ) एकानें म्हणावं– दिल्ली चलो !

**जंगलू**—( साथ देतो ) आगे बढो !

**बाबू**-- दुसऱ्यानें म्हणावं--सत्त बोलो !

**जंगलू**-- हिंसा छोडो !

**बाबू**--- तिसऱ्यानें म्हणावं -- मिल चलो !

**जंगलू**--- माल बढो !

**बाबू**---शेवटी आम्हांला कांहींच समजेनासं झालं म्हणजे आम्हींहि म्हणावं ( उजव्या कानात बोट घालतो ) इधरसे घालो, अन् ( डाव्या कानांतून बोट काढून ) इधरसे काढो !

**जंगलू**-- ( डाव्या कानांतून बोट काढून ) इधरसे काढो !

**बाबू**
**जंगलू** } जैसे थे !

( शोभा ट्रे मधें चहा व फराळाचें घेऊन येते. तिला पाहतांच अन्तू चड-फडत उठतो व जाऊं लागतो )

**प्रकाश**–अरे ए अन्तू ! अरे चहा तर घेऊन जा ! (अन्तू जातो)

**शोभा**–काय, झालं काय त्याला जायला असं एकाएकी ?

**बाबू**–अहो आजकालची दुनिया अशीच आहे -- सत्त बोलो! –

**जंगलू**–गत्त है ! ( बाबूहि साथ देतो )

( तोंच मघाचे पो. इ. व पो. कॉ. प्रवेश करतात. त्याबरोबर सर्वांचे चेहरे गंभीर होतात )

**प्रकाश**—Well ! आतां काय झालं आणखी ? या !

**पो. इ.**— ( पूर्वींचा होता नव्हता तो विनय सोडून करारी आवाजांत ) तुम्हां दोघांनाही पकडण्यांत येत आहे. ही तुमचीं वॉरंटस् ! ( दोघांनाहीं वॉरंटे देतो. )

**शोभा**–(प्रकाश व गोविंद आपापलीं वॉरंटें वाचीत असतां ) कशाबद्दल वॉरंटं आहेत ही ? ( संतापाने लाल झालेली दिसते )

**पो. इ.**–Public Safety Act !

**शोभा**–म्हणजे काय ?

**पो. इ.**—प्रथम पंधरा दिवस बंदी – त्यानंतर जरूर वाटल्यास तीन महिने सहा महिने—

**गोविंद**—(मधेंच बेपर्वाईनें ) बारा वर्षे–!

**प्रकाश**–कामगारांसाठी पोस्टर्स रंगवणं हा गुन्हा आहे ? ( वारंट परत करतो )

**पो. इ.**– I don't know ! (खांदे उडवतो )

**गोविंद**–मी लिथो प्रेसचे कागद चोरले ! ! ! That *is* Capital ! ( आपलें वॉरंट परत करतो )

**शोभा**– बरं, पण याना चहा वगैरे तरी घेऊ द्याल का ?

**पो. इ.**– अवश्य ! -- घ्या, आपण चहा घ्या.

**प्रकाश**–काही नको मला चहा बिहा ! चला ! ( जाऊ लागतो. इतक्यांत आठवण होऊन ) पण थोडे पेटस्, पेपर, ब्रशेस् घेऊं का बरोबर ?

**पो. इ.**– No, that's not allowed !

**गोविंद**– हः ! फुलमाळ्याचा लाकुडतोड्या झाला म्हणजे तो कळ्या कशा काय गोळा करणार ! त्याने मोळ्याच गोळा करायला हव्यात ! नाहीं का ?

**पो. इ.**–None of your lectures please !

**प्रकाश**–( जवळच असलेल्या स्टुलाला संतापानें लाथ मारतो. स्टुलावर असलेले रंगाचे पेले वगैरे इतस्ततः उधळले जातात ) झालं तुमचं समाधान ! चला ! ( प्रथम प्रकाश, त्याच्या मागून गोविंद, नंतर पो. कॉ. त्यानंतर पो. इ. व सरतेशेवटीं शोभा बाहेर जातात )

**जंगलू**–अँ ! काहचले पकडलं जी याहिला ?

**बाबू**–तू एकलं नाहीस वाटत ! अरे हा शेपटीचा कायदा आहे. शेळीची शेपटी कशी असते – ती तिच्या अगावरच्या माशाहि हाकलत नाहीं अन् तिची लाजहि झांकत नाही ! हा शेपटी कायदासुद्धां असाच आहे ! लोकांच्या भोंवती घोंघावणाऱ्या भाडवलदार माशा तो हाकलू शकत नाही अन् पिळणुकीमुळें नागवलेल्या लोकांची लाजहि झांकू शकत नाही !

**जंगलू**- ( बाबूच्या बोलण्याकडे फारसें लक्ष न देतां ) आपल्याले त मोठी भूक लागली भैय्या ! ( ट्रेमधील दोन बशा उचलून स्वतःच्या समोर ठेवून त्यांतला एक मोठा बकाणा भरतो. बाहेर मोटार गेल्याचा आवाज. )

**बाबू**- ( बाहेर जायला वळलेला असतो – पण जंगलूच्या वागण्यामुळ थोडा चिडल्यासारखा परतून ) तूं किनई मोठा अधाशी आहेस जंगलू – अरे बाई वापस येऊन पाहील तर ( शोभा परत येते ) काय म्हणेल !

**शोभा**- ( थबकते. तिचें अंतःकरण जड झालें आहे. ती जंगलूकडे पहाते, व आंत जातां जातां अर्धवट पुसटपणें ) बाबू, खाऊं दे त्याला. (घरांत जाते)

लाजून त्या बशा पुन्हा जागच्या जागीं ठेवीत असतांना पडदा. )

( अंक दुसरा समाप्त )

# अंक तिसरा

( स्थळ पूर्वीचेंच. पण आता स्टुडियोमधील सोफा, स्टुलें, कागद, चित्र, फ्लॉवर पॉटस्, रंगाचे पेले, इत्यादि सामान नाहीसें झालें आहे. ग्राऊंड-ग्लासच्या भिंतीशीं आपल्याकडे तोंड करून ईझल उभे आहे, व त्यावर भंगि-णीच्या डोक्यावर तिचें मूल व खराटा असलेलें टोपलें, असें, पूर्वीचें अर्धवट काढलेलें चित्र टोंचून ठेवलें आहे. फक्त दोन सोफा-चेअर्स, एक सेंटर-पीस, लिहावयाचें टेबल, त्यावर पानदान, फोटोफ्रेम, कांही लहानमोठे ब्रशेस, एवढेंच सामान आतां स्टुडियोंत असतें. स्टूडियोंतील दिवा जळत असतो, कारण वेळ संध्याकाळच्या सहाची आहे. पडदा बाजूला होतो त्यावेळीं बाबू व जंगलू शेर-तराजूनीं रद्दी मोजण्यांत गुंतले असतात. बाबू Illustrated Weekly मधलें त्याला आवडलेलें एक चित्र पहात असतो. जंगलू त्याच्या चित्रकलेच्या आवडीबद्दल चिडलेला असतो, कारण त्यामुळें रद्दी मोजण्याचें काम खोळंबलें असतें. अखेर तो त्रासतो. )

**जंगलू**– हां, द्या ना हो लौकर ! का पाहून राहिले त्या चित्रामधि सव्हाचं–रात व्हायले आली ना आतां !

**बाबू**– ( पहात असतो तें चित्र बाजूला ठेवून ) हां घे. (एक ढीग देतो) एकूण किती शेर झाली रे ही ?

**जंगलू**– ( दर शेरास एक अंक असे दहा अंक बाजूला ठेवले असतात ते मोजून ) हे झाली दहा सेर–आतां दहा अन् किती बारा होतेत ? दोन सेर अधिक टाका म्हंजे बारा सेर होईल – नाही ! बस झाली का जी एवढ्यानं कुल रद्दी ?

**बाबू**- ( त्याची थोडी थट्टा करीत ) थोडी झाली का रे ? दीड मणाच्या वर झाली ना – तुझी दलाली कांहीं थोडी नाहीं झाली.

**जंगलू**- पन तुम्हांस त लगीत भेटली असल ना दलाली ! – तुम्ही किती रुपयाचं सामान विकलं थे त सांगा —

**बाबू**-मीहि विकलं तीनचारशें रुपयांचं सामान – अन् मला मिळालेहि शंभर एक रुपय – पण त्यांतले सप–कमिटीला नाही दिले पाऊणशे !

**जंगलू**- (खाजगी दरवाज्याकडे चोरून पहात हलकेच) अधिक दाग-दागिने किती विकले जी बाईनं ?

**बाबू**- विकले असतील रे ! आंतां तुला उशीर नाहीं होत ना चांभार-चौकशा करायला ! हं, घे चल मोज लौकर !

**जंगलू**— (एक शेर रद्दी मोजून झाल्यावर उरलेल्या बऱ्याचशा रद्दीकडे पाहून) अन् आतां थे झाली जशी एक सेर – सोडा ना आतां !

**बाबू**- ही एवढी फक्त एकच शेर का रे ! मोठा हिसाब करनेवाला आला !

**जंगलू**- ( लोचटपणें ) अं : ! असल पाव आर्धा शेर अधिक – टाका ना आतां ! इतका माल घेतला- ( शोभा विद्याला घेऊन खाजगी खोलींतून बाहेर येते. विद्याचें वय १८।१९ वर्षे. दिसायला चुणचुणीत, बांधा सडपातळ, नीट नेटकी, वेणीचा एक शेंपटा मागें व दुसरा समोर असतो, त्याच्याशीं चाळा करीत ती इकडे तिकडे पहात असते. त्याना पाहतांच ) हं, बर चला मोजा—थोडयासाठीं काहचले गडबड पाहिजे हिसाबामंधी !

**बाबू**- ही चांगली दोन शेर आहे -- घे नीट मोजून हवी तर (उभा होतो)

**शोभा**-किती झाली रे एकंदर, बाबू ?

**बाबू**- ही झाली तेरा शेर अन् आधीची दीड मण मिळून— [ एक मण तेहतीस शेर ]

**शोभा**- बरं, आतां तीं मराठी वर्तमानपत्रं घेऊन ये थोडींशीं आहेत तीं– त्या आंतल्या आलमारीवर आहेत ती – घेऊन ये जा.

( बाबू विद्यार्थी खोलींत जातो. शोभा व विद्या यांचें बोलणें चालू असतां जंगलू शेवटची दोन शेर रद्दी मोजून थोडी थोडी पोत्यांत भरीत असतो. तिकडे त्यांचें लक्ष नसतें. )

**शोभा**–बरं विद्या ! शुभमंगल सावधान हं ! कधीं जाणार आहे म्हणालीस तुमचं वऱ्हाड उमरावतीला ?

**विद्या**–शनिवारीं जाऊं म्हणतो आम्ही सारे.

**शोभा**–किती मुलांचा आशीर्वाद देऊं तुला ?

**विद्या**–इश्श् – पण बाई ! कसा ओका ओका दिसतो हा स्टुडियो आतां ! मला तर भीतिच वाटते बाई ! कसं करवलं हें तुम्हांला कोण जाणे !

**शोभा**–( तिच्या खांद्यावर दोन्ही हात प्रेमानें ठेवून ) अग, नवीन आश्रम स्वीकारायचं मनापासून ठरलं म्हणजे जुन्याचा त्याग करताना कांहीं वाटत नाहीं ! – आतां आठ दिवसांनीं तूं मिसेस घारपुरे होशील – तेव्हां विद्या भागवत हें नांव सोडतांना तुला आनंदीआनंदच होईल !

**विद्या**– इश्श् ! – ती गोष्ट अन् ही गोष्ट एकसारखीच वाटतं ?

**शोभा**– काय, नांव काय म्हणालीस घारपुऱ्यांचं ?

**विद्या**– हट् गडे ! ( शोभाला कवटाळते )

**शोभा**– चांगले गोरे आहेत कीं नाही तुझ्यासारखे –फोटो तरी आणायचा होतास ग दाखवायला ! —

**विद्या**- ( एकदम आठवण झाल्यासारखी ) खरंच बाई – तुम्ही सरचे सगळे ब्रशबिशसुद्धां विकून टाकले कां हो ?

**शोभा**– सगळे ब्रश कशाला विकायचे ? चित्रकला अजिबात सोडून कां द्यायची आहे साहेबांना ?

**विद्या**---मग -- पण जाऊं दे – कांही तरीच आहे मी – (घुटमळते)

**शोभा**—काय, काय, – सांग ना !

**विद्या**—थोड्या दिवसांसाठी त्यांचे ब्रश द्याल का मला ? सरचे हातचे ब्रश किनई फार छान असतात – तसले ब्रश बाजारांत मिळतच नाहींत – माझं काम झालं कीं आणून देईन मी परत. चालेल का ?

**शोभा**—( आपुलकीनें ) चालेल, चालेल ! घे तुला यांतले हवे ते. ( तिला जिन्याखालील टेबलापाशीं घेऊन जाते व विद्या तिला हवे असलेले बरेचसे लहानमोठे ब्रश उचलून घेते; फार मोठाले तिथेंच राहूं देते. विद्याकडे मिस्किलपणें पहात ) घारपुऱ्यांना आहे का ग आवड चित्रकलेची ? – कां

त्यांचा पोर्ट्रेट काढायचा विचार आहे ? ( डोळे मिचकून ) हो, म्हणजे त्या निमित्तानं त्यांच्याकडे एकसारखं टक लावून पहायला सोयीचं – नाहीं का ? ( जोरानं हंसते )

**विद्या**–( धीटपणें तिची उलट थट्टा करीत ) सर असंच करत होते वाटतं तुमचं लग्न झालं तेव्हां ! ( असं म्हणून तिला पुन्हा बिलगते व खुदकन् हंसते )

**शोभा**– (खोटया दरडावणीनें, तिचे गालगुच्चे घेत) हं ! हं ! चाल-लीस शेंफारत – लहान तोंडीं मोठा घास !

**विद्या**– (लाडिकपणें) मग तुम्ही तरी किती थट्टा करतां हो माझी ! – पोर्ट्रेट बिर्ट्रेट कांहीं नाहीं काढायचा मला ! आमच्या बागेंत कीं नाहीं, फ्लॉक्स अन् पिंक्सच्या फुलांच्या इतक्या सुंदर व्हेरायटीज आल्या आहेत – तसल्या फुलांचीं डिझाइन्स काढून यतांत रंग भरण्यांत खूप मजा वाटते मला–

**शोभा**– (प्रेमानें ओथंबून तिचें तोंड दोन्ही हातांत धरून तिच्याकडे पहात) काढा, काढा ! – खूप फुलं काढा, अन् खूप रंग भरा त्यांत हवे तेवढे ! (असें म्हणून तिला दरवाज्याकडे पोंचवते. ती बाहेर जाण्यापूर्वी) पण पुन्हां येशील तेव्हां माझ्यासाठीं फुलं आणायला विसरायचं नाहीं हं !

**विद्या**–( बाहेर जाण्यापूर्वी मानेला राग व दुःखाचा एक झटका देऊन ) पण आणलीं तरी ठेवणार कुठं आहांत तीं ! चांगलीं फ्लॉवरपॉटस् सुद्धां तर विकून टाकलींत ! ( जाते )

**शोभा**–( दारांतून पहात ) आतां पुन्हां केव्हां येशील ग ? (लांब हेल)

**विद्या**–( लांबून) लग्नाला जायच्या आधीं येईन एकदां – बुधवार--गुरु-वारकडे येईन.

( शोभा तिला हात हालवून निरोप देते व आपल्याच तंद्रींत परत येते. तिचें लक्ष जंगलूकडे नसतें )

**जंगलू**–( काम संपल्यासारखा उठून उभा होऊन ) बाई !

**शोभा**– काय रे ?

**जंगलू**– पहेली दीड मन झाली, अन् हे आता तेरा सेर झाली जसी. साडबारा रुपये मनाच्या हिसाबानं – [ माहे तुमच्याकडे अन् दलालीचे – ]

**शोभा—** मी बाबूला सांगितलं आहे तुझा सगळा हिशेब करायला. ( दरवाज्यांतून अन्तू डोकावतो. त्याला पाहिल्यानंतरहि त्याच्याकडे मुद्दाम दुर्लक्ष करून ) अजून थोडीशी मराठी रद्दी आहे, ती मोजणं झालं – ( अन्तू दारांतच उभा राहून इकडेतिकडे पहात असतो, त्याला तुटकपणें ) कां, दारांतच उभे ? आंत येऊन बसा ना – ( पुन: जंगलूला ) ती मोजणं झालं म्हणजे करूं तुझा एकंदर हिशेब. बहुतेक सपलीच आहे आतां रद्दी –

**अन्तू—** ( आत येतो. पण खुर्चीवर न बसतां इकडेतिकडे पहात सिगारेट पीत खुर्चीपाशींच उभा असतो व शोभा आपल्याकडे मुद्दाम लक्ष देत नाहीं असा संशय येतांच ) शोभा, काय मांडलं आहेस काय हें तू ? तूं चित्रशाळेतलं सगळं सामान विकायला काढलंस असं ऐकतों मी !

**शोभा** — ( बाबू मराठी दैनिकांची रद्दी घेऊन येतो त्याच्याकडे पाहून व अन्तूकडे मुद्दाम दुर्लक्ष करून )आणखी किती शिल्लक आहे रे बाबू आतां ?

**बाबू—** आतां चार दोन शेर तीं साप्ताहिकं आहेत – बस्स. ( रद्दी ठेवतो )

**शोभा—**आण तर ती सगळी गोळा करून, तोंपर्यंत मी देते ही जंगलूला ढीग करून मोजायला -- ( खालीं वाकून ढीग करूं लागते )

**अन्तू**—( आपला हट्ट सोडीत नाहीं ) शोभा, मी तुला आनंदाची बातमी सांगायला आलों आहें. ( तरी शोभा आपल्याच कामांत दंग असते ) प्रकाश बहुतकरून एकदोन दिवसांत सुटेल !

**शोभा**–( त्याच्याकडे न पाहतां निर्विकारपणें ) अस्सं –

**अन्तू**– तुला आनंद नाहीं झाला ही बातमी ऐकून ?

**शोभा—** ( तरी त्याच्याकडे न पाहता उग्रपणें ) ते ज्या कारणामुळं पकडले गेले त्याबद्दलचा संताप इतक्या लौकर ओसरण्यासारखा नाहीं— हं :! अन् ते आज सुटले म्हणून उद्यां पकडले जाणार नाहींत कशावरून ? ( कामदांचा ढीग करूं लागते )

**अन्तू—** नाहीं, आतां नाहीं पकडला जाणार तो--मी खात्री देतों. आज सकाळींच या बाबतींत होम मिनिस्टरशीं बोलणं झालं माझं --अन् प्रकाश आतां सुटणार आहे तोहि त्याचमुळं.

**शोभा—** ( उपरोधानें ) Thank you vely muoh ! ( कागद गोळा करीतच असते )

**अन्तू**— ('आतां अगदीं मेटाकुटीला येऊन तिच्याजवळ खेटून उभा होतो) शोभा ! तुला वेडबीड तर नाहीं लागलं ! हें रद्दी विकण्याचं काम तुला एवढं महत्त्वाचं वाटतं ! अन् उद्यां प्रकाश सुटून आल्यावर हें स्मशान पाहून काय म्हणल याचा विचार तरी केलास का तूं ?

**शोभा**— (ताडकन् उभी होऊन) आपण मेहेरबानी करून त्या तिथं बसाल का ?

**अन्तू**— (ओंचटपणा करीत) नाहीं ! माझ्याबद्दल नक्की तुझा कांहीं तरी गैरसमज झालेला दिसतोय् – तो दूर होईपर्यंत मी तुझं कांहीं एक ऐकणार नाहीं.

**शोभा**— (पुढील वाक्य इतक्या जोरानें उसळून बोलते कीं तो भ्याल्यासारखा एकदम दूर होतो) आज त्यांना जेलमध्यें जाऊन आठ दिवस झाले. तुम्हांला इथं यायला आज फुरसद झाली, नाहीं ?

**अन्तू**—(थोडा वरमल्यासारखा आत्मसमर्थन करीत) माझी होम मिनिस्टरशीं चांगली ओळख आहे, हें तुला माहीत आहे. प्रकाश निरपराधी असून त्याला पकडलं हें कळतांच त्याला सोडवण्याच्या खटपटीला मी लागेन हेंहि तुला ठाऊक आहे—पण माझ्या खटपटीला जर आजपर्यंत यशच आलं नाहीं तर मी तोंड तरी कसं दाखवूं तुला ?

**शोभा**—( संतापाच्या भरांत झरझर घरांत जाते व ५।१० सेकंदांनीं एक लिफाफा घेऊन येते आणि तो त्याच्यापुढें धरून ) हें पाहिलंत तुमचं होम मिनिस्टरशीं असलेल्या सख्ख्याचं सर्टिफिकेट ?

**अन्तू**—( तिच्या हातून तें पत्र काढून घेण्यासाठीं सरसावतो ) पाहूं काय आहे तें. ( ती हात मागें घेते ) मला दाखवल्याशिवाय काय समजूं मी ?

**शोभा**—दूर व्हा ! ( जंगलू आपलें काम बाजूला सारून चाललेली घटना पहात असतो. तो एकदम अन्तूच्या जवळ येऊन उभा होतो. अन्तू त्याच्याकडे तिरस्कारानें पाहतो व बाहेर जाऊं लागतो. त्याला उद्देशून ) चाललांत कुठं ? उभे रहा तिथं ! जंगलू, दारावर रहा ! ( जंगलू चटकन् दारावर जाऊन उभा होतो. अन्तू पिंजऱ्यांत सांपडल्यासारखा इकडे तिकडे पहात असतो ) ऐका ! तुम्हीं विसरलां नसालच त्यांतला मजकूर

अजून —तुमच्याच स्वाक्षरीचं आहे हें सर्टिफिकेट ! ( वाचते ) "आपल्या आर्टिस्टच्या बाबतींत तुमची माहिती खरी असेल तर कॅबिनेट जो निर्णय त्याच्या बाबतींत घेईल त्याविरुद्ध माझें कांहींच म्हणणें नाहीं ! "– ऐकलंत ?

**अन्तू**–( भांबावल्यासारखे करीत ) म्हणजे ! प्रकाशला पकडण्यांत माझी संमति होती असं तुला वाटतं ! मी खरंच सांगतों – [ मला असा संशय – ]

**शोभा**–त्या दिवशी तुमच्या नाकावर टिच्चून पोलीस घरांत शिरले अन् तुम्हांला कांहीं ठाऊक नाहीं ?

**अन्तू**–पण ते प्रकाशला पकडायला आले असतील ही कल्पनासुद्धां मला शिवली नाहीं !

**शोभा**–मग ते निरपराधी असून पोलिसनीं त्यांना चुकीनं पकडलं असं तुमचं म्हणणं आहे ?

**अन्तू**–( थोडी हिंमत आल्यासारखा ) मीच काय – होम मिनिस्टरचं देखील हेंच म्हणणं आहे !

**शोभा**–मग आठ दिवस डांबून कशाला ठेवलं आहे त्यांना ?

**अन्तू**–त्याच दिवशी त्याला सोडलं असतं तर सरकारनें नांगी टाकली असं समजून कामगारांनी जास्तच धुडगूस घालायला सुरुवात केली असती – आतां संपाची परिस्थिति सरकारच्या काबूत आली आहे – कामगार बहुतेक आज – उद्यांत सगळेच उरलेसुरले संप मागें घेतील असा रंग आहे.

**शोभा**–( त्याच्या तर्कटाची चीड येऊन) अन् तरीसुद्धां ते निर्दोषी आहेत अन् ते चुकीनं पकडले गेले असं तुम्ही मला सांगतां ! हंः ! स्वतःला फारच चलाख समजायला लागलां आहांत हो आतां ! ( शेवटचें वाक्य संपण्यापूर्वीच बाबू ' ज्ञानदीप ' चे अंक घेऊन येतो )

**बाबू** —हे इतके ' ज्ञानदीप ' चे अंक आहेत—

**शोभा**—(त्यांकडे बोट दाखवून) हे ! तुमचे ' ज्ञानदीप ' ! पेटले तुमच्या अकलेचे दिवे ! (बाबूला) कांहीं नाहीं विकायचे ते मला—मीच पेटवते ते ! जा निघा ! अगदीं किळस आली आहे मला तुमची ! जंगलू ! जाऊं दे त्यांना ! (अन्तू घुटमळत उभा राहतो. शोभा ताडकन् खुर्चीवर येऊन आदळते व त्या पत्राचे दोन तुकडे करते)

**जंगलू**-(अन्तूला) अजी जन्तू महाराज! आतां बऱ्या बोलानं बाहार पडतां का देऊ तुम्हांस एखांदी दवाई!

**अन्तू**—(जळफळत जांतां जातां) ठीक आहे! (जातो)

**जंगलू**—(शोभा हातावर कपाळ टेकून आपला संताप शांत होण्याची वाट पहात बसली असतां हळूच ) बाई, हे रद्दी जाळूनसन्या माहं गरीबाचं नुकसान काह्यले करता ?

**शोभा**—( विमनस्कपणें ) काय म्हणालास ?

**जंगलू**—नाहीं, मीनं म्हनलं हे रद्दी जाळतां काह्यले ? माही गरीबाची नुकसानी—

**बाबू**—(आतांपर्यंत गंमत पहात उभा असतो, तो जंगलूचा लोंचटपणा पाहून रागावल्यासारखा ) काय आहे रे! इतकी रद्दी मिळाली तरी- [ तुझं पोट भरलं नाहीं. - ]

**शोभा**-घेऊं दे रे त्याला ती—जंगलू घेऊन जा ती तशीच-कांहीं नकोत मला तिचे पैसे - उचल अन् कर ते अंक एकदाचे माझ्या डोळ्याआड!

**बाबू**-हं कर रे तुझा सगळा हिसाब -- ( बाबू व जंगलू मराठी दैनिकांची पांच शेर रद्दी मोजतात व त्यानंतर जमिनीशीं टेकून बोटें मोडत हिशेब करूं लागतात. इतक्यांत खांसाहेब सारंगीसह प्रवेश करतात )

**खां सा.**— ( शोभा खुर्चीवर कष्टी झाल्यासारखी बसली आहे. तिचं लक्ष खां साहेबांकडे नसतें. खां साहेब भांबावल्यासारखे इकडे तिकडे पाहून कांहीं वेळानें ) अँ! शोभाबाई! हे का झालं ? इथलं समदं सामान पोलीसवाल्यान जप्ती केलं ?

**शोभा**— ( एकदम आदरानें उठून ) बंदगी खां साहेब - या बसा! ( तरी खां सा. इकडेतिकडे पहात असतात ) साहेबांना पकडलं त्या दिवशीं तुम्हीं आला होतां -- पण मग कुठं गडप झालांत इतके दिवस ? बाबांना तर कांहींच करमत नाहीं आतां साहेब गेल्यापासून!

**खां सा.**— (खुर्चीवर येऊन बसतां बसतां ) पन मला हें त सांगा--इथलं समदं सामान -[ कुठं गेलं - ]

**शोभा**— विकलं तें मी -पोलीसनीं नाहीं -[जप्त केलं]

**खां सा.**— विकलं!!

**शोभा** — हो मी शाळा बंद करायचं ठरविलं आहे साहेब गेल्यानंतर.

**खां सा.**— काहून ? साहेब सुटतील नाहीं आतां ?

**शोभा** — सुटणार आहेत म्हणतात ते लौकरच -- पण ते आतां ही शाळा नाहीं चालवणार यापुढं–

**खां सा.**— तुम्ही जेहलांमधीं भेटले होते त्यांना ?

**शोभा**– भेटलें होतें पहिल्या दिवशीं -- पण ही शाळा बंद करायचं मीच आपल्या मनानीं ठरवलं परत आल्यानंतर.

**खां सा.**—पन ते उद्यां वापस आले त का म्हणतील ?

**शोभा**—कांहीं नाहीं म्हणणार. ज्या दिवशीं त्यांना पकडून नेलं त्या दिवशीं इथल्या साऱ्या सामानाला लाथ मारून गेले ते — असं त्यांनीं कधींच केलं नाही यापूर्वी !

**खां सा.**—पन त्या वख्ती गुस्स्यांत येऊन त्याहिनी लात मारली — आणखी तुम्ही ही इस्कूल बंद भी केली — विकून भी टाकली !

**शोभा** —मग त्यांत चुकलं कुठं ? त्यांना जर रागच आला या शाळेचा–

**खां सा.**— अजी कोनत्या गोष्टी करता तुम्ही ! तुम्हांस कांहीं समजत नाहीं ! आज इतकी उमर झाली मी सरंगीचा रीयाज करून राहचलो तरी एखाद्या वख्ती हात बेसुरा पडून जातो — गेल्या साली एका मैफलीमधीं असाच हात बेसुरा पडून गेला माझा त काडकन् डसून दिलं मी या (डाव्या) हातास ! एका वख्तीं त मी चांगला साज फोडून टाकला गुस्स्यांत येऊन – म्हणून पीछा सोडला का जी मी या बाज्याचा ! अन् तुम्हास हा ख्याल नाहीं राहचला, साहेबास गुस्सा आला त तुम्ही काहून तोडून टाकली ही इस्कूल ? माझा हात बेसुरा पडला त माझी बीबी फोडल का जी माझा साज ? माझी बीबी अशी गोष्ट करती त मी का केलं राहात ठाऊक आहे ! तिचाच हात तोडून टाकला राहता ? अजी कांहीं सोच समज करून गोष्टी करा ! मनामधीं – [ आलं अन् करून टाकलं – ] !

**शोभा**– तुम्ही साहेबांना ओळखलं नाहीं खां साहेब ! आमचं एकमेकां-वर इतकं प्रेम – [ आहे कीं ज्या कारणामुळें मी हें केलं – ]

**खां सा.**—अजी का फजूल प्रेमाच्या – मोहबतीच्या गोष्टी तुम्ही शिकवतां

मला आतां या उमरीमधीं ! आपला हुन्नर अन् आपलं अवजार यापरीस इलमदार मानसाला कोनती गोष्ट अधिक प्यारी राहचते ! अँ!!

**शोभा**–तुमच्या ध्यानांत नाहीं आलं खां साहेब, मी काय म्हणतें तें ! वरफा जुळल्या नाहींत म्हणजे तुमच्या सारंगीचं जसं होतं तसं साहेबांच्या हुन्नराचं आजकाल झालं आहे.

**खां सा.**––याचा काय मतलब ?

**शोभा**–तुम्हीं सारंगी जुळवतां म्हणजे तरी काय करतां? आधीं कोणचा तरी षड्ज कायम करतां अन् मग त्याचा वरचा मध्यम, पंचम, षड्ज लावत जातां. हे वरचे स्वर जर सही सही लागले तर ते छेडल्याबरोबर मूळचा षड्ज आपोआप जबाब द्यायला लागतो. अन् षड्ज छेडला तर वरचे मध्यम पंचम जबाब द्यायला लागतात. यालाच म्हणतात ना सारंगी जुळवणं ?

**खां सा.**– बहोत अच्छे बहोत अच्छे शोभा बाई –

**शोभा**– खऱ्या कलावंताचं जनतेशीं असंच परस्पर आंदोलनाचं नातं असतं. जनतेच्या मनाचा जो सूर असेल त्याच्यावरचा सहीसही मध्यम-पंचम-षड्ज खऱ्या कलावंताचा असतो. जनतेच्या मनांत जें असेल तें अशा जोरदार आणि सहीसही शब्दांत कलावंत बोलतो की तें ऐकल्याबरोबर जनतेचं मन तारे-सारखं आपोआप डोलू लागतं. पण ही करामत त्याच कलावंताला साधते जो जनतेच्या मनांत कोणता सूर वाजतो आहे तें जनतेंत जाऊन छेडून पाहतो, अलीकडे अलीकडे साहेबांचं काय व्हायचं – गरीबांची हलाखी पाहिली कीं त्यांना तिचं चित्र काढावंसं वाटायचं – पण चित्र काढायला बसले कीं त्यांना असं कधींच वाटायचं नाहीं कीं तें पाहून गरीब जनतेकडून सहीसही दाद – जबाब मिळेल. याचं कारण माझ्या ध्यानांत आलं. जनतेच्या मनांत कोणता सूर वाजतो आहे हें घरीं बसून त्यांना समजणार नाहीं. जेलांत जातांना त्यांनीं या शाळेला जी लाथ मारली ती पोलीसवाल्यावर रागावून मारली नाहीं --त्यांना आपल्या कलेच्या कमजोरीची जाणीव अलीकडे फार व्हायला लागली होती. ते आतांशा नेहमीं म्हणायचे -- आजकाल असं काय झालं आहे ? माझी स्फूर्ति कुठें गेली ? त्याचं कारण हेंच कीं आजच्या हलाखी बरबादीच्या विरुद्ध जनतेचा कोणता सूर किती चढला आहे तें त्यांना घरीं बसून समजणं शक्य नाहीं. तेव्हां मी ठरवून टाकलं, कीं ते सुटून आले

कीं त्यांना सांगायचं कीं उच्च दर्जाच्या कलावंताला होणारं समाधान जर तुम्हांला हवं असेल तर जनतेचा आवाज जनतेंतच जाऊन छेडून ऐका, अन् त्यानंतरच आपल्या मध्यम --पंचमाच्या तारा चढवा – मग त्या प्रयत्नांत तुमची तार तुटली तरी हरकत नाहीं, पण सहीसही स्वर लावण्यांतच ती तुटूं द्या !

**खां सा.**– पण शोभाबाई ! साहेबांनीं चित्र काढण्यांत जी तरक्की केली आहे तिची बराबरी तर या शहरांत कोणी भी केली नाहीं – मग – [ तुम्हांला कोणची कमजोरी दिसली ]

**शोभा**— तुम्ही नाही का केली सारंगी वाजवण्यांत एवढी तरक्की ; पण म्हणून सगळीं गाणी – विशेषत: अलीकडची जनतेची गाणी तुम्हांलाहि एकदम नाहीं वाजवतां यायचीं ! त्यांतलीं कांही गाणीं तर या सारंगींतून निघूंच शकणार नाहींत.

**खां सा.**— अजी का सांगतां तुम्ही ! —

**शोभा** –माझं ऐका तर आधीं ! तुमची ठुमरी, कजरी, गजल ज्या– काळांत हे संगीताचे प्रकार निर्माण झाले त्या काळांत कांहीं लोकांना जो दर्द व्हायचा त्याची दाद या प्रकारांत त्याना मिळत असे. त्या लोकांना जें दु:ख व्हायचं तें पिया गेल्याबद्दल – आनंद व्हायचा तो पिया भेटल्याबद्दल – कांहींना पिया म्हणजेच परमेश्वर वाटायचा. आजसुद्धां ज्या लोकांना हें संगीत आवडतं तें या भावनांत जे रंगू शकतात त्यानाच आवडतं ! (स्वरांत गाऊन दाखवते) ‘ सावनके दिन आये – धडके मोरी छतिया ’ असं म्हटल्याबरोबर त्यांच्या हृदयांत खळबळ सुरू होते – पण आजच्या युगांतली अफाट जनता ज्या दु:खानें हैराण झाली आहे त्या दु:खाचा स्वर जनतेच्या कवीला ऐकूं आल्या-बरोबर त्याच्या हृदयांतून जे शब्द बाहेर पडतात ते कसे असतात सांगूं ? श्रावण आला – पण हर्षाला उधळीत वर्षा आलीच नाही – अन् असंच राहिलं हें निळं आकाश – खेळवीत सावकाश – पांढऱ्याच ढगांना – तर ? चिंता जडून धडकी भरे ! इतकंच नव्हे, तर आज चोंहीकडे दिसणारी हलाखी, हाल–अपेष्टा, निष्फळ कष्ट, दु:खं, रोग, लढाया, दुष्काळ, बरबादी – हें सारं घालवणं आहे आपल्याच हातीं – माणसांतच आहे ती शक्ति – ती बुद्धि – पण त्या शक्तीची आणि बुद्धीची जाणीव मात्र माणसाला नाहीं, हें सारं

पाहून तर कवीचं अंतःकरण तडफडूं लागतं ! त्या वेळचे कवीचे दर्दभरे शब्द ऐकून सारे भुकेकंगाल चिडून उठतात, आणि मग क्रांतीचीं जीं गीतं ते गाऊं लागतात तीं गीतं तुम्हांला या सारंगीवर नाहीं वाजवतां यायचीं ! तीं गाणीं निराळीं ! त्यांचीं वाद्यं निराळीं – त्यांचे वादक निराळे !

**खां सा.**–असं कोणतं गाणं राहूं शकतं जी, जें या सारंगींतून नाहीं निघूं शकत ?

**शोभा**– म्हणूं कां मी तसलं एखादं गाणं ? मला तितकंसं चांगलं म्हणतां येत नाहीं – कामगार चळवळींत एक बाई आहे ती तें अस्सं छान म्हणते – प्रथम ती म्हणते, मग बाकीचे लोक म्हणतात. (बाबू व जंगलू जमिनीला तोंड लावून कुजबुजत व बोटें मोजत हिशेब करीत असतात त्यांना) तुम्हांला येतं ना रे तें गाणं ? म्हणा बरं जरा माझ्याबरोबर. ( ते हिशेब बाजूला ठेवून एकदम उभे राहतात. शोभा कमरेला पदर खोंचून व हातांत स्टूडियो-मधला टी – स्क्वेअर पडला असतो तो घेऊन एक ललकारी देते व गाते. पडद्यामागून ढोलक्याची व पांचसहा आवाजांची साथ होते)

**शोभा**—

**ललकार !**
**दुमदुमते ललकार ! ऐका ही ललकार !**

**नव्या जगाचा – माणुसकीचा – स्वातंत्र्याचा—**
**निर्माता, रक्षक यापुढती कामगार ठरणार !**
**सजवाया दुनिया दुनियेची श्रमिकावरचि मदार !**
**त्याची ही ललकार ! ऐका रे ललकार !**

**दगडमातिच्या – प्रभु-धर्माच्या – थोतांडाच्या—**
**गोळ्या अफुच्या खातखात तो स्वस्थ किती पडणार !**
**जुन्या जगाच्या रक्तांतुन जो नवा जन्म घेणार**
**त्याची ही ललकार ! ऐका रे ललकार !**

दरेक दिवशीं – खडेंघाशीं – गांठ मृत्युशीं—
लढतां लढतां निसर्गाशिं, तो फुकट किती मरणार !
धनवानाचा बनविण्यास हैवान नाहि जगणार !
हीच अतां ललकार ! ऐका रे ललकार !

विज्ञानाचे – शास्त्र-कलेचे – कष्ट युगांचे—
परपुष्टांच्या मुठींत पिचुनि नष्ट नाहि होणार !
दुर्मुखल्या – थकलेल्यांना जो हातभार देणार
त्याची ही ललकार ! दुमदुमली ललकार !

ललकार !
दुमदुमली ललकार ! ऐका रे ललकार !

**खां सा.**—( आतांपर्यंत गाणें ऐकत असतात, पण तें थांबतांच एक निश्वास सोडून ) शोभाबाई, आज मला मोठं दुख झालं ! अजी हें का गानं आहे का जी ? इथं कांहीं वादी-संवादी, स्वरविस्तार ! कांहीं ताल ! ( उठतां उठतां )अरे! अरे! मी बाबासाहेबांस जाऊन सांगतों बेफजूल तुम्ही माझी तालीम शोभाबाईला इतकीं बरस दिली ! (जिना चढूं लागतात)

**शोभा**— ( निराश होऊन त्यांच्याकडे पहात ) खां साहेब ! मी चुकले आहे असं वाटलं तुम्हांला ! (खां साहेब मौन धरून वर जात असतात ) खां साहेब !

**खां सा.**— बस्-आतां बिलकुल गुस्सा येऊन गेला तुमचा मलाँ -- तुम्ही मला धोका दिल्ला. बाबासाहेबास धोका दिल्ला -- अन् तुमच्या साहेबास भी ! (माडीवरच्या खोलीत प्रवेश करतात. शोभा निराशेनें भांबावल्यासारखी कांहीं वेळ वरच पहात उभी असते. नंतर जड पावलांनीं खुर्चीवर येऊन बसते, एवढ्यांत बाबू शोभाजवळ येऊन उभा होतो. )

**बाबू**- ( क्षणभर विचार करून ) जंगलूचा हिशेब तयार झाला आहे-

**एक मण** अडतीस शेराचे त्याच्याकडून एकंदर चोवीस रुपये सहा आणे घ्यायचे अन् त्यांतले तीस टक्के त्याला कमिशन द्यायचें म्हणजे एकूण सोळा रुपये आणि चार आणे घ्यायचे.

**शोभा**– (हा सगळा हिशेब ती ऐकत नसते हें उघड आहे. पण बाबू स्वस्थ उभाच आहे हें ध्यानात येतांच जड आवाजांत ) किती घ्यायचे म्हणालास ?

**बाबू**– सोळा रुपये चार आणे घ्यायचे आहेत जंगलूकडून.

**शोभा**– सोळा रुपयेच घे – वरचे चार आणे जाऊं दे. (डोळे मिटून स्वस्थ बसते. जंगलू खिशातून बऱ्याचशा जळकट नोटा व काही नाणीं मिळून सोळा रुपये तयार करतो व बाबूजवळ देतो. बाबू ते तिच्यापुढें करून उभा राहतो. तिचें लक्ष नसतें.)

**बाबू**– (चारपांच सेकंदानंतर) हे घ्या सोळा रुपये.

**शोभा**– (ते निर्विकारपणें घेऊन शेजारच्या खुर्चीवर फेकल्यासारखे ठेवते) बरं, जा तुम्ही आतां. उद्यां या पुन्हा, म्हणजे बाकीच्या सामानाची व्यवस्था करूं – तस विकण्यासारखं आता फारसं शिल्लक राहिलं नाहींच – तरी पण येऊन पहा ! अन् जातांना तेवढा दिवा मालवा–(खुर्चीच्या पाठीवर मान टाकून अगदीं आराम घेण्याची तयारी करते. माडीवर सारंगीच्या तरफा वाजूं लागतात. बाबू व जंगलू रद्दीचें पोतें घेऊन जातात. जाण्यापूर्वीं स्टुडियोमधील दिवा मालवतात. स्टुडियोंत अंधार. ग्राउंड ग्लासच्या भिंतीं-तून पलीकडच्या दिव्यांचा उजेड येतो. शोभाला झोंप येऊं लागते. म्हणजे सर्वत्र हळूहळू अंधार होऊं लागतो. पूर्ण अंधार. शोभाला स्वप्न पडतें. तिला दिसतें कीं विद्या ' विद्यार्थी ' खोलीतून हळूहळू पदाघात करीत गातगात तालावर नाचत असल्यासारखी अवतीर्ण झाली आहे. तिनं वऱ्हातींत नवऱ्या मुलीनें नटावें तशीं विरविरीत वस्त्रें परिधान केलीं आहेत. कपाळावर फुलांची मुंडावळ आहे. एका हातांत देठांसकट कमळाचीं फुलें आहेत. दुसऱ्या हातांत मोगरीच्या कळ्यांचा कलाबतूमुळें चकाकणारा हार आहे. एखाद्या परीसारखी मधेंच कुजबुजत तर मधेंच मोठ्यानें अशी ती गाते )

**विद्या**— फुलति कळ्या मोगरिच्या
शांत समयिं रात्रींच्या
तुज अर्पाया स्वकरीं हार गुंफिले
तुला कधिं न वाहिले
किरणांच्या रेषांनीं
चित्र काढते रजनी
कल्पनेंत जवळि तुझें चित्र रेखिलें
तुवां कधिं न देखिलें
वायुसवें तरु हाले
गळति लतांवरुनि फुलें
आठवुनी तुजसि किती अश्रु ढाळिले
तुवां कधिं न पुसियले

( शेवटचा चरण गात असतां तिच्या डोळ्यातून अश्रुप्रवाह सुरू होतो व तिला हुंदके येतात. ती डोळे न पुसता तशीच उभी असते. शेवटच्या चरणाच्या अगदी शेवटी शेवटी, नीटनेटके कपडे घातलेला व नेहमीपेक्षां जास्त उजळ दिसणारा व केस विचरलेला गोविंद 'खाजगी' खोलींतून गंभीरपणें अवतीर्ण झाल्यासारखा प्रवेश करतो व विद्याला पाहताच थबकतो. तिची स्थिति पाहून त्याचें अंतःकरण द्रवल्यासारखें दिसतें. कांहीं वेळानें अत्यंत मृदु आवाजात तो बोलूं लागतो. )

**गोविंद**—कलिके ! ( विद्या एकदम दचकून पाहते व स्वतःला सावरीत डोळे पुसू लागते ) तूं इथं कशी आलीस ? तू वाट चुकलीस का ?

**विद्या**—नाहीं, मी वाट चुकले नाहीं. या घरांतल्या प्रकाशाच्या साह्यानें माझी कला या इथंच जन्माला आली, इथंच वृद्धिगत झाली ! हें घर माझं आहे—तूं कोण आहेस ? तूच वाट चुकून इथं आल्यासारखा दिसतोस !

**गोविंद**—(तिला समजावून सांगतो) नाहीं बरं ! मी वाट चुकलों नाहीं—याच घरातल्या शोभेच्या पोटी माझाहि जन्म झाला—माझी आजच्या जगां-

तील कलहांतले कष्ट सोसण्याची शक्ति इथंच वाढली – इथंच मीहि लहानाचा मोठा झालों !

**विद्या**—मग आपण आजपर्यंत एकमेकाला भेटलों कसें नाहीं ?

**गोविंद**-हं: ! कला आणि कष्ट ! एकाच घरांत जन्माला येणारे हे बहिण-भाऊ -- पण ते एकमेकाला चकविण्याचा खेळ खेळत असतात तोंपर्यंत कसे भेटणार !

**विद्या**—काय तू माझा भाऊ आहेस ! ( तिला आनंद होतो ) ए भाऊ रे ! माझं एक काम करशील ? (गोविद तिच्याकडे कुतुहलानें व कौतुकानें नुसताच पहात असतो. ) हें रे काय, बोलत का नाहीस ? करशील कां माझं काम ?

**गोविंद**--( तिचा हेतु ओळखून मान हालवितो ) अं हं ! नाहीं करणार ! तुझं काय काम आहे ते न सागतां आधीं वचन मागतेस नाहीं कां ! ( मग अगदी प्रेमानें तिचें नाक चिमटींत धरून ) मला आधीं हें सांग, हे पंचबाण ( तिच्या हातांतलीं फुलें काढून घेतो ) अन् हा गळफास ! (तिच्या हातांतला हार काढून घेतो) – ही सारी तयारी कोणाच्या शिकारीची आहे सांग बरं ! आजच्या काळांतहि केवळ फुलांत रमणारा एखादा प्रियकर असेल तुझा – त्याला शोधून आणायला सांगणार असशील मला ! ( तिला एकदम गहिवर येतो व ती डोळे पुसू लागते ) बरं बरं, रडू नकोस अशी ! ( तिची पाठ थोपटून समजूत घालतो ) तुला कांही कळत नाहीं ग ! तुझी ही कामलता ! फुललेल्या वेलीसारखी आपल्याच सुदरतेशीं तन्मयता– आजच्या भांडवलशाही अराजकतेच्या वावटळीत सापडून एका गिरकीसरशीं तूं करपून जाशील बघ ! अन् मग तू अन् तुझा फुलबाज आधार – दोघेहि बसाल जन्मभर एकमेकावर आग पाखडत ! तुझे हे फुलांचे गाल, फुलासारखे डोळे, त्यातलं नीर अन् अंजन, नीरांजनासारख्या लुकलुकणाऱ्या त्यांतल्या दोन फुलवाती – उमलत्या कळीसारखी चुटुचुटु भाषा – सदैव फुलासारख्याच जीवनाची आशा ! तुझ्या या पुष्पमय प्रतिमेत तुझ्या माणुसकीचं रक्षण करणारं कठोर हृदय जर वसत नसेल तर फुलाचं जसं आज शिरावर अन् उद्यां केरावर होत तसंच होईल तुझं बघ ! तसं होऊं देऊं नकोस तं आपलं ! उद्यां माझ्यासारख्या दांडग्या पोराची आई शोभशील अशी झाली

पाहिजेस तूं. तुझा प्रियकर तुला पुन्हा भेटला म्हणजे त्याला सांग – म्हणावं– निसर्गाच्या संपत्तीवर, माणासाच्या बुद्धीवर आणि शक्तीवर भांडवलदारांनीं आपली अनैसर्गिक मालकी लादून आज माणसाच्या अन् माणुसकीच्या मध्यें वित्ताची अमानुष भिंत उभी करून ठेवली आहे, त्यामुळं वित्त नसेल तर त्याला माणुसकी परवडत नाहीं–अन् असेल तर वित्ताचं कुंपणच त्याच्या माणुसकीचं शेत खाऊन टाकतं. जेव्हां ही मधली भिंत जमीनदोस्त होईल तेव्हांच व्यक्तिमात्राला आपली सारी शक्ति एकवटून मुक्त हस्तानें आपलं सर्वस्व समाजाला अर्पण करण्याचं अन् गरज पडेल तें मुक्तकंठानं समाजापासून मागण्याचं स्वातंत्र्य मिळेल. तुझ्या प्रियकराला सांग – मुर्दाडाच्या कळपांत स्वतःचा कोंडमारा करून घेणाऱ्या मेंढरावर प्रेम करणारं कोंकरूं व्हायचं नाहीं मला ! भांडवलाच्या त्या भिंतीला जमीनदोस्त करण्याच्या लढ्यांत पडायला तूं तयार असशील तरच तुझं माझं जमेल – जा सांग त्याला !

**विद्या**–(उल्हसित होऊन) भाऊ ! अशी तुझ्या विचाराची सोबतीण तुला मिळेल का रे ?

**गोविंद**–(अगदीं खात्रीपूर्वक) हो ! न मिळायला काय झालं !

**विद्या**–कधीं मिळेल ?

**गोविंद**–उद्यां मिळेल – काळजी करूं नकोस तूं !

**विद्या**–उद्या ! कधीं येणार आहे तुझी ती उद्यां !

**गोविंद**–माझी उद्यां ! माझी उद्यां म्हणजे अडाणी आशावाद नाहीं, कीं दुबळा दैववाद नाहीं – माझी उद्यां मी आपल्या हातांनी घडवतो आहे – ती आल्याशिवाय कशी राहील !

**असत्य जीर्ण ' काल ' चें सदैव ' आज ' मोडतों**
**' उद्यां ' ! तुझेंच सत्य जोडण्यास शक्ति वेंचतों**
**उद्यां ! तुझ्यांत संपवीन आजची महानिशा**
**उद्यां ! तुझ्यामधेंच पाजळीन शांतता–उषा**
**उद्यां ! तुझ्यामधें ज्वलंत आजचा निवान्त मी**
**उद्यां ! तुझ्यामधेंच शान्त आजचा अशान्त मी**

( तो शेवटचा चरण डोळे मिटून म्हणत असतो त्या वेळीं विद्या आपल्या डोक्याची मुंडावळ काढून त्याच्या हातावर ठेवते व मागल्यापावलीं अदृश्य होते. शेवटचा चरण संपतांच गोविंद तीं फुलें, हार व मुडावळ मस्तकावर धारण करतो व त्यांचा सुवास घेत असतांनाच उजेड हळूंहळूं नाहीसा होतो. गोविंद अदृश्य होतो. शोभाचें स्वप्न या ठिकाणीं संपतें. कांहीं काळ संपूर्ण अंधार असतो. नंतर ग्राउंड-ग्लासच्या भिंतींतून पुन्हा पूर्ववत् उजेड दिसूं लागतो. शोभा जोराचा एक निःश्वास सोडते. पुन्हा झोपेंत असल्यासारखी शांत होते. चार पांच सेकंदांनंतर प्रकाश प्रवेश करतो. प्रवेश करतांच दचकून खिळल्यासारखा उभा होतो. दिवा लावतो, इकडे तिकडे पहातो, भेदरल्या-सारखा शोभाकडे पहातो. सारंगीच्या तरफा माडीवर वाजत असतात, त्या कान देऊन ऐकतो. धांवत शोभाजवळ येऊन उभा होतो. )

**प्रकाश**– ( घाबरल्यासारखा ) शोभा ! ( ती संथच असते–म्हणून मोठ्यानें ) शोभे ! ( तिचे खांदे धरून तिला गद्गद हालवतो. ती एकदम जोराचा श्वास घेऊन सोडते व दचकल्यासारखी डोळे उघडते. निमिषमात्र तिच्या कांहींच ध्यानांत येत नाही. )

**शोभा**–( भानावर येतांच एकदम आनंद होऊन ) हें काय ? तुम्हीं आलांत ? केव्हां आलांत ? ( त्याचा खांदा धरून उभें होण्याचा प्रयत्न करीत असतां ) आधीं चहा करत्यें हं तुमच्यासाठीं. ( असें म्हणून उभी होते, तोंच तिला भोंवळ येते ) आई ग ! ( मटकन् खुर्चीवर बसते )

**प्रकाश**–( भेदरल्यासारखा ) हें काय ? काय झालं तुला शोभा ? ( मोठ्यानें ) खां साहेब ! ( माडीकडे पहातो. पण त्याच वेळीं खां साहे-बांनीं आपल्या सारंगीच्या तरफा फर्कन् वाजवल्या असतात )

**शोभा**–( त्याबरोबर प्रकाशचा खांदा धरून आर्जवानें ) नका ! खां साहेबांची तंद्री अशी मोडूं नका !

**प्रकाश**–म्हणजे ! !

**शोभा**– ( भ्रमिष्टासारखी त्याच्याकडे खिळलेल्या नजरेनें पहात एकेक शब्द सावकाश, थकल्यासारखी बोलते ) तुम्हांला ऐकूं येत नाहीं का ? ते तरफा जुळवताहेत ते ! (पुन्हां तारांचा आवाज) तें पहा !

**प्रकाश**– ( हतबुद्ध होऊन ) तरफा जुळवताहेत ? म्हणजे काय ? (**तरी**

ती त्याच्याकडे पण शून्यांत पहात राहते. तिला हालवून ) शोभा ! अशी भ्रमिष्टासारखी काय पाहतेस तू ? मला समजेल असं काहीं बोल ! हें इथलं सारं सामानसुमान काय झालं ? ( तरी ती नुसती पहातच असते ) एकदां तरी समजावून सांग मला !

**शोभा**- (त्याचा हात आपल्या हातांत धरून गंभीरपणें) तुम्हांला तारा जुळवण्याचा अर्थ कळत नाहीं ? तुम्ही कलावंत आहांत ना ? (उठूं लागते; तो तिला आधार देतो ) या, तुम्हांला सारं सांगते – असं घाबरायला काय झालं बरं ? (ती पुढें व तो मागें असें एकमेकांचा हात धरून तीं दोघें पायऱ्यां-पर्यंत जातात. तिथून ती मागल्या पावलीं एकेक पायरी चढूं लागते) ऐका ! (माडीवरच्या सारंगींतून भीमपलासीचे स्वर एकेका तर्फेच्या टणत्काराच्या रूपांत ऐकू येतात, त्या टणत्कारांबरोबर तीहि स्वरांचा उच्चार करते व मागल्या पावलीं एकेक पायरी चढते) नी – सा – ग – म – प – नी – सा ऽ ऽ ऽ ! (शेवटच्या स्वराबरोबर लँडिंगवर स्थिरावते, व तो स्वर विरून जातांच स्मित करून) त्या उंच स्वराची तार तुटायची एखादे वेळीं, नाहीं ! पण तिच्या टणत्काराबरोबर खालचा षड्ज कसा आंदोलित होतो ऐकलात ! तार तुटेल या भीतीनं ती कमी चढवली तर ? (वेडावून बेसूर स्वर लावते) सा ऽ ऽ ऽ. शी: ! थट्टेनं लावला तरी बेसूर स्वर कसा लागतो ! मळमळायला लागतं अगदी !

**प्रकाश**–( खालच्या पायरीशीं खिळल्यासारखा उभा असतो व आ करून नुसताच पहात असतो – त्याला गहिंवर दाटतो ) शोभा !

**शोभा**—थांबा ! ( तळतळून ) किती अधीर – अशान्त असतां तुम्ही पुरुष ! अस लहान मुलासारखं काय करायचं बरं ! आपल्या आंदोलनानं मानवी हृदयाला हालवून सोडणारे स्वर निर्माण करण्यासाठीं खां साहेब एकेक तार किती कसोशीनं लावतात ! कध्धी घाई करीत नाहींत ! तारेला ताण असह्य होऊन ती उतरली कीं तिला पुन्हा चढवतात – पण बेसूर स्वराच्या निर्मितींत त्यांना कध्धीं समाधान वाटत नाहीं ! माणसानें माणसा-साठीं केलेल्या निर्मितीच्या अशा भरीव साफल्यांतच खरं समाधान असतं ! (तारसप्तकांतील षड्ज खां साहेब पुन्हां छेडतात. तीहि स्वरांत म्हणते) सां ऽ ऽ. अहा ! किती सुंदर–किती बरोबर लागला आहे स्वर ! आ ऽऽ ऽऽ ऽ !

( दुसऱ्याच क्षणीं ती तार तुटते, त्याबरोबर अंतःकरण तुटल्यासारखी )–स् ! ( निश्वास सोडते ) गेली बिचारी ! गंजली असेल ती ! गंजलेल्या तारेला उच्च स्वरांत रंगण्याचा ताण नाहींच सहन होत ! ( एकदम वास्तवतेची आठवण होऊन ) पण खां साहेब देतील तिला फेंकून ! ते शोक करीत नाहीं बसायचे ! निसर्गदेखील असाच निर्घृण असतो, नाहीं ? पिकलेल्या पानांतून फूल येत नाहीं, निसर्ग देतो त्यांना भिरकावून – अन् मग नवी पालवी, नवी फुलं, नवी फळं ! नव्याच्या निष्पत्तीसाठी जुन्याचं हें असलं मरण ! एखादे वेळीं कसं पिळवटून निघतं हृदय ! – निर्मितीची ही नियति पाहून ! ( तिचा श्वास जोराने सुरू होतो व पिळवटलेलें हृदय संभाळून धरीत असल्यासारखी ती मटकन् खालीं बसते व कठड्याच्या खांबाला टेकते ) आई ग ! ( प्रकाश अतिशयच घाबरतो आणि जोरानें हुंदका देऊन पायऱ्या चढून धांवत जातो. त्याला हातानें अडवून ) घाबरूं नकोस ! ( तो तिच्या खालच्या पायरीवर बसतो ) अरे असा घाबरतोस काय – अं ? ( त्याच्या खांद्यावर हात ठेवते ) संपली हं प्रस्तावना आतां – आतां थोडं कथानक ऐक ! ( थांबते ) ऐक ! पण संभाळ ! नाहीं तर तुझं हळवं मन ‿ तुला वाटेल, कोसळलं आभाळ ! ( त्याच्याकडे ओथंबलेल्या दृष्टीनें पहाते )

**प्रकाश**–( काकुळतीनें ) पण शोभे – राहूं दे ना ! तुझा हा एवढासा चिमणा जीव – ज्याला सोसत नाहीं वारा, पाऊस, ऊन; जो या इथं – या घरट्यांत – कालपर्यन्त – निवारा घेऊन राहिला – आज तोच जीव असा एकाएकीं भरधांव वाऱ्यावर आरूढ होऊन, गरुडाला मागें टाकीत निसटणार कीं काय, झेंपा घेत घेत – अशी भीति वाटून, व्याकूळ होतं आहे माझं मन. बघ – अन् असं वाटतं कीं ही तारका, आपल्याच तारेंत रंगून, एखाद्या तुफानावर तुटून पडतांच भस्मसात् तर होणार नाहीं ना !

**शोभा**– भस्मसात् ‿ ! कदाचित् होईल ! होणारहि नाहीं कदाचित् ! ही हमी घेईल कोण? कारण ‿ जो कोणी प्रतिभेचा बाण ‿ घेतो पाजवून ‿ पाषाणावर ‿ निधड्या छातीच्या ‿ अन् जीवनांतले सारे धागेदोरे एकत्र पिळवटून बांधतो गांठ ‿ अन् मग ओढून कमान पंचप्राणांची, धरतो संधान ‿ त्याची दृष्टि ‿ त्याची दृष्टि, मर्यादित सृष्टि सोडून पलीकडे जातांच ‿ ती कमान.

सोंसून सारा ताण सोडील बाण, कीं पडेल मोडून त्या आधींच ?⌃⌄सांग तूंच सांग⌄⌃⌄भविष्यास घेऊन विश्वासांत⌄⌃⌄मी भस्मसात् होईन कीं होणारच नाहीं⌄⌃⌄ही ग्वाही देईल कोण !

**प्रकाश**–( आर्जवपूर्वक युक्तिवाद करूं लागतो ) तर मग शांत हो–थोडी शांत ! तुझी ही मादक ऊर्मि – तिचा उन्माद – जातांजातां मर्मी घालील घांव – त्याचा हा डाव ओळखून, तुला कळवळून सांगतों ऐक ! काळाची चाहूल ऐकून – एकेक पाऊल – एक तरी पाऊल – मागेंच टाक !

**शोभा**—( खेदपूर्वक ) अजून ! अजून ती भाषा ! जिच्यामागें अभिलाषा⌄⌃⌄⌃केवळ जगण्याची⌄⌃⌄⌃कसंहि करून ? आपल्या कारागृहाला आकार देणारी आपलीच कारागिरी ! तें जहर ! जगवणार जें कसं तरी, टोंचणी देत देत⌄⌃⌄⌃अखेरपावेतों ! जीव धरून झांकलया मुठींत, गुदमरून, मरत मरत जगणं तें ! जगवणार नाही मला ! अन् तुलाहि नाहीं बघवणार ! त्यापेक्षां ⌄⌃⌄⌃(आवेशानें उठून उभी होते, प्रकाश एक पायरी खालीं उतरून तिच्याकडे भारल्यासारखा पाहूं लागतो ) त्यापेक्षां हा क्षोभ⌄⌃ही आत्तांची तडफड⌄⌃जगण्याचं भान हरपून सणसणलेल्या तारेची ही अमूर्त, अस्फुट धडधड⌄⌃ऐक ! ऐक हा हुंकार⌄⌃पोटच्या गोळ्याचा⌄⌃एका तिळभर जिवाचा⌄⌃जो कितीहि दुबळा असला आज⌄⌃नाहीं ज्याला ज्ञान, समाधान, सौंदर्य⌄अन् चोहीकडून कोंडला असला⌄तरी ज्यास भरवीन घास⌄एकेक सावकाश⌄⌃माझ्या रक्तामांसाचा⌄⌃अन् मग जो फुटतांच प्राण, शब्द, पंख, सोडून सावली माउलीची, मोडून छत्र तिचं, करून निशाण, सुटतो जसा बाण, एका क्षणीं, एका क्षणांत⌄⌃तसा होईल स्वतंत्र ! पहा ! पहा हा सोहळा⌄हा सुखसोहळा आपल्या मरणाचा⌄⌃मरून जगण्याचं हें जीवनतंत्र पहा !!! ( तिचा श्वास जोरांत सुरूं होतो – मान मागें टाकून वर पहात असतां ती आपल्या मातृत्वाच्या अभिमानानें परिपूर्ण झाल्यासारखी दिसते. )

**प्रकाश**–( त्या सौंदर्यानें मंत्रमुग्ध होतो, व हळूहळू भानावर येत, सावकाश, एकेक शब्द हळूहळू मोठ्यानें उच्चारीत एकेक पायरी उतरतो. ) थांब हं ! तशीच उभी रहा ! तिथंच थांब ! हा सुयोग, हें भाग्य लाधूं दे⌄⌃⌄⌃ही पर्वणी साधूं दे ! नाहीं तर दुसऱ्याच क्षणीं विरून जातील दिक्कालांत, हे सारे रंग⌄⌃⌄⌃स्वर्गीच्या

या धनुष्याचे ~~~ या यःकश्चित् मनुष्यास आठवणारहि नाहींत मग ! सांठवूं दे आत्तांच ! थांब हं ! ( मागें फिरून रिकाम्या चित्रशाळेकडे पाहून जोरानें हंबरडा फोडतो ) अरेरे ! रेखाटूं दे रेषा कशातरी ~~~ एक तरी ( सामान शोधीत इतस्ततः धांवूं लागतो – मोठाले ब्रश हातीं लागतात ते वेड्यासारखा भिरकावून देतो ) खुडूं दे चार कळ्या ~~~ दोन तरी कळ्या, उन्हाळ्या-आधीं ! अरेरे ! मालवल्या दिशा ! झाला अंधार ! ! ही पर्वणी ~~~ कसली ही पर्वणी ! ! ! ( खुर्चीवर येऊन आदळतो आणि मोठ-मोठ्यानें हुंदके देऊं लागतो. शोभा आपल्या वैभवाच्या शिखरावरून दयार्द्र अंतःकर-णानें एकेक पायरी उतरते, त्याच्या खुर्चीमागे येऊन उभी होते व त्याच्या खांद्यावर हात ठेवून ओणवून त्याच्याकडे पहाते. प्रकाश मागे टेकून अश्रू पुसत तिच्याकडे पाहतो ) काय झालं हें ?

**शोभा**– तुझ्या कलेची तार गंजली होती – जनमनाच्या उच्च स्वराशीं ती जुळूं शकत नव्हती – कंपित होईनाशी झाली होती. ती फेंकून मी नव्या खणखणीत तारेसाठीं जागा करून ठेवली ! आपल्या जीवनांतल्या वाळलेल्या काटक्यापाचोळ्याला फळ येणं शक्य नव्हतं – तें सारं मी आपल्या हातांनीं फेंकून नव्या पालवीची तयारी केली. विधात्याच्या विधीला आपला हात लावून ममत्वाची जोड देऊन त्याचं वैभव वाढवलं – त्यांत चुकलें का मी ?

**प्रकाश**–( हतबुद्ध होऊन ) म्हणजे ! तूं केलंस हें सारं ! ! (थांबतो) घरापाशीं येतां येतां एक कविता मी गुणगुणत होतों –

**शोभा**–( त्याच्या खुर्चीच्या हातावर येऊन बसते ) कोणती कविता ?

**प्रकाश**–( गुणगुणतो )

**वाट ही संपली**
**घर दिसूं आलें**
**दुरुनि पाहातां**
**घराकडे येतां – घरापाशीं येतां —**

**लागली चाहूल**
**माझ्या पावलांची**

**धांदल कुणाची**
**किती उडे आतां**
**घरांत शिरतां - घरामधें जातां —**

**एखादी कविता**
**साधें गोड गीत**
**म्हणूं सुस्वरांत**
**अंधार पडतां**
**घरांत रंगतां – जग विसरतां—** (डोळे पुसूं लागतो)

**शोभा–** (दुःखी होऊन कठोरपणें) अंधार पडतां – घरांत रंगतां – जग विसरतां! जग विसरून घरांत रंगायचे दिवस! – ते दिवस गेले! थोड्याच वेळापूर्वी गोविंदानें उच्चारलेले शब्द माझ्या कानांत एकसारखे घुमताहेत!

**प्रकाश–** (एकदम जागा झाल्यासारखा उभा होतो) गोविंद! कुठें आहे तो? त्या दिवसापासून त्याची माझी ताटातूट झाली आहे – कुठं आहे तो?

**शोभा–** (खेदपूर्वक) स्वप्नांत दिसला तो मला! तो म्हणाला :– (पुढील शब्द शोभा पुटपुटते. पण पड्यामागून प्रत्यक्ष गोविंदचाच आवाज आकाशवाणीसारखा दोघानाहि ऐकू येतो) "माझ्यासारख्या दांडग्या मुलाची आई शोभशील असं झालं पाहिजे तुला – तुझा प्रियकर तुला पुन्हा भेटला म्हणजे त्याला सांग – म्हणावं, निसर्गाच्या संपत्तीवर, माणसाच्या बुद्धीवर अन् शक्तीवर भांडवलदारांनीं आपली अनैसर्गिक मालकी लादून आज माणसाच्या अन् माणुसकीच्या मधें वित्ताची अमानुष भिंत उभी करून ठेवली आहे. त्यामुळं वित्त नसेल तर माणुसकी परवडत नाहीं – अन् असेल तर वित्ताचं कुंपणच त्याच्या माणुसकीचं शेत खाऊन टाकतं. – जेव्हां ही भांडवलाची भिंत जमीनदोस्त होईल तेव्हांच व्यक्तिमात्राला आपली सारी शक्ति एकवटून मुक्तहस्तानें आपलं सर्वस्व समाजाला देण्याचं अन् गरज पडेल तें मुक्तकंठानें समाजापासून मागण्याचं स्वातंत्र्य मिळेल. तुझ्या प्रियकराला सांग – मुर्दाडांच्या कळपांत स्वतःचा कोंडमारा करून घेणाऱ्या एखाद्या मेंढरावर प्रेम करणारं कोंकरूं व्हायचं नाहीं मला! भांडवलाच्या त्या अमानुष भिंतीला जमीनदोस्त करण्याच्या लढ्यांत पडायला तूं तयार असशील तरच तुझंमाझं जमेल – जा सांग त्याला!"

**प्रकाश**--( स्वप्नांतून जागा झाल्यासारखा पण जड अंतःकरणानें ) लिथो प्रेसच्या संपाचं काय झालं ?

**शोभा**— ( कठोरपणानें त्याला हिणवते ) तो संप ?– मोडला ! त्या प्रेसच्या आर्टिस्टांच्या घरांत आतां छानसा अंधार पडला आहे ! त्या अंधारांत एखादी कविता गात गात आता ते घरांत रंगतील अन् जग विसरतील !

**प्रकाश**– ( दुःख, संताप, पश्चात्ताप इत्यादि भावनांच्या मिश्रणाचा स्फोट झाल्यासारखा, थरथर कांपत ) शोभे ! कां ओतते आहेस हें विष तूं माझ्या कानात ! (इकडे तिकडे भांबावल्यासारखा शोधक दृष्टीनें तो पाहतो. त्याला ईझलवरचें अर्धवट काढलेलें भंग्याच्या पोराचें चित्र दिसतें – मग खालीं पडलेला मघाचा एक मोठा ब्रश दिसतो, तो उचलून ) तुला काय वाटतं ! – वित्ताच्या ज्या कोंडवाड्यांत आपण जन्मभर कुजत पडलों अन् माणुसकीला पारखे होत गेलों त्याच कोंडवाड्यांत आणखी एका मेंढराची भर टाकण्यासाठीं तुझ्या पोटच्या गोळ्याला जन्माला घातलं आहे मी ! ( तिला हातांतील ब्रश दाखवतो ) हा पहा, यापुढं हा असला मोडका ब्रश जरी मला मिळाला तरी तो घेईन – भांडवलाच्या जुलमाविरुद्ध जिथं जिथं क्षोभ सळसळत असेल तिथं तिथं जाईन – त्या क्षोभानें खवळलेल्या माझ्या रक्तांत–प्रक्षोभाच्या त्या तप्त रसांत– (ईझलकडे बोट दाखवून) उज्ज्वल मानवतेच्या त्या अस्फुट ठिणगीचं चित्र पुरं करीन – अन् त्याच्या स्फोटाचा साऱ्या जगभर कडकडाट करीन ! ! तुझ्या पोटच्या उद्यांच्या मानवाला साक्ष ठेवून सांगतों, ऐक ! जोपर्यंत भांडवलदारानीं उभी केलेली वित्ताची अमानुष भिंत जमीनदोस्त होऊन तिच्या मातींतून स्वतंत्र माणसांचीं फुलं उगवत नाहींत, तोंपर्यंत हीच माझी सामग्री, हीच चित्रकला अन् हीच माझी चित्रशाळा ! ( आत्मविश्वासानें ) येऊन पहा मी काय सांगतों आहे तें ! ( धाडकन् दरवाजा उघडून बाहेर जातो. शोभा आश्चर्य, आनंद, काळजी इत्यादि भावनांची कळ आल्यासारखी खुर्चीवर बसते. शेजारच्या सेंटरपीसवर अन्तूचें फाडलेलें पत्र पडलें असतें, तें घेऊन दरवाज्याकडे पहात, आपल्याच विचारांत पत्राचे बारीक बारीक तुकडे करूं लागते. थोड्या वेळानें उठून दरवाज्याकडे घाईघाईनें वळते. तोंच पडदा. )

**समाप्त**

# आभार : क्षमा : अर्पण

पन्नाशीच्या घरांत शिरतां शिरतां लिहिलेलें माझं हें पहिलें नाटक, माझी एकटयाचीच करामत आहे असें म्हणण्याची 'दांडगाई' करणें, निदान माझ्या वयामुळें तरी मला शक्य नाहीं. या नाटकाची स्फूर्ति मला जीवनांतील विविध अनुभवांमुळेंच झाली. ते अनुभव मला समाजाकडून प्राप्त झाले. सारा समाजच त्या स्फूर्तीच्या मुळाशीं आहे.

पण त्या स्फूर्तीची, आज ज्या स्वरूपांत मी हें नाटक समाजाला सादर करतों आहे त्या स्वरूपांत जी परिणति झाली, ती मात्र माझ्या अनेक स्नेहयांच्या संबंधाचें, सूचनाचें व सहकार्याचें फळ आहे. समाजाचें ऋण हें नाटक लिहून मी अल्पशा फेडतों आहेच, पण माझ्या स्नेहयांचें ऋण त्यांचे व्यक्तिशः आभार मानूनच फेडणें माझें कर्तव्य आहे.

अशा स्नेहयांपैकीं सर्वारंभीं मी श्री. गणेश महादेव मोटे यांचा उल्लेख करतों. मानवी जीवनांत शांति, पुष्टि आणि तुष्टि प्रस्थापित करणें हें सामुदायिक, अव्याहत परिश्रमाचें व कष्टाचें काम आहे; ती एखाद्याच्या वैयक्तिक निष्ठेची, अथवा केवळ तात्पुरत्या करमणुकीची 'खाजगी बाब' नाहीं. अशा सामुदायिक परिश्रमांना व कष्टांना प्रवृत्त करणें, ते रुचिर करणें, हलके करणें, हें कलेचें कार्य आहे. — परिश्रम–कष्टांपासून निवृत्त करणें नव्हे. कष्टाच्या व कलेच्या या साहचर्याची जाणीव मला श्री. मोटे यांनींच प्रथम करून दिली.

अर्धवट लिहिलेल्या स्थितींत जवळ जवळ सहा महिने हें नाटक पडून होतें. १९४८ च्या जानेवारीत श्री. पु. ल. देशपांडे यांनीं त्याच स्थितींत तें वाचलें, आणि मी तें पुरतें केलेंच पाहिजे असा हट्ट धरला. त्यांच्यासारख्या

चोखंदळ माणसाचा हा हट्टच नव्हे तर त्यांनीं केलेल्या कांहीं सूचनाहि हें नाटक पूर्ण होण्याला जबाबदार आहेत.

एखाद्या नाटकांतील संवादासाठीं 'मुक्तछंदा'चा उपयोग मराठींत जरी प्रथम मीच केला असला, तरी तो श्री. आत्माराम रावजी देशपांडे ( कवि अनिल ) यांनींच मराठी साहित्यासाठीं घडविलेला अत्यंत मौल्यवान असा अलंकार आहे. त्यांच्या कांहीं कवितांचाहि या नाटकांत मी उपयोग केला आहे. नाटकाच्या शेवटीं 'प्रकाश'च्या तोंडीं घातलेला 'प्रक्षोभाचा तप्तरस' हा शब्दप्रयोग देखील त्यांच्याच 'प्रक्षोभ रसा'चें थोडेंसें व्याप्त रूप आहे.

या नाटकाचें ( पोर्ट्रेट – आर्टिस्टच्या स्टूडियोचें ) 'सेटिंग' कसें असावें याबद्दल सुप्रसिद्ध चित्रकार गोडसे यांनीं मला मुद्दाम आपल्या घरीं बोलावून सचित्र सूचना केल्या.

हें नाटक संपूर्ण लिहून झाल्यानंतर प्रथम वाचलें असें प्रा. सौ. कुसुमावती देशपांडे यांनींच. टीका–वाङ्मयांतील त्यांचें उच्चस्थान ध्यानांत असल्यामुळें, कित्येक वर्षांचा स्नेह असूनहि त्यांना मी भीतभीतच हस्तलिखित वाचा-वयास दिलें. माझी एक चूक त्यांनीं माझ्या लक्षांत आणून दिली आणि 'फार सुंदर झालें आहे' असें म्हणून मला खरीखुरी हिंमत दिली.

'तशी' हिंमत मला माझे मित्र श्री. 'शान्ताराम,' श्री. गो. रा. दोडके, श्री. कृ. वि. पुराणिक, श्री. सखाराम जोशी, श्री. ह. ना. वैद्य आणि नागपूर नाट्य मंडळाच्या बऱ्याचशा सभासदांनींहि दिली, इतकेंच नव्हे तर या नाटकाच्या रचनेंतहि त्यांनीं वेळोवेळीं आपुलकीनें भाग घेतला.

रंगभूमीवर आणण्यापूर्वी विविध विचारसरणींच्या माझ्या अनेक स्नेह्यांना आणि अधिकारी व्यक्तींना हें नाटक ऐकविणें मला अगत्याचें वाटलें. लेखक-वाचकाचा जो परस्पर–संबंध असतो त्यापेक्षां किती तरी अधिक जिव्हा-ळ्याचा परस्पर–संबंध नाटक–प्रेक्षकाचा असतो. नाटकाचें भावी यश अल्पशः तरी अजमावतां यावें म्हणून नटवर्य चिंतामणराव कोल्हटकर, नानासाहेब फाटक; नाट्यकलेचे प्रेमी सर चिंतामणि देशमुख, श्रीमंत बाबूराव देशमुख, श्री. मो. ज्ञा. शहाणे, राजा बढे; टीकाकार प्रा. मं. वि. राजाध्यक्ष, प्रा. प्रभाकर माचवे, श्री. गोपाळ गुंडो गोखले, श्री. व सौ. चित्रे

( 'अभिरुचि' ); आणि नाट्यकलेंत क्रांतिकारक बदल घडवून आणण्यासाठीं अव्याहत आणि यशस्वी प्रयत्न करणारे लोकनाट्य (I. P. T. A.) चळवळीचे पुढारी श्री. अण्णाभाऊ साठे, श्री. अमर शेख आणि श्री. गव्हाणकर — या सर्व अधिकारी मंडळींवर हें नाटक ऐकवण्याचा मी जुलूम केला. त्यांनीं तो सहन केला एवढेंच नव्हे तर प्रत्यक्ष माझ्याजवळ आणि अप्रत्यक्षपणें सूचना करून तें शक्य तितकें दोषरहित व्हावें म्हणून मला मदत केली — नुसतीच शाबासकी दिली नाहीं.

पहिल्या अंकांतील शुद्ध भटियार रागांतील चीज मला श्री. केशवराव भोळे यांनीं दिली.

मनोहर ग्रंथमालेच्या चालकांनीं फारच थोड्या अवधींत हें नाटक प्रकाशित केलें, व प्रकाशकांबद्दल लेखकवर्गाला वाटणारी सार्वत्रिक धास्ती प्रत्येकच प्रकाशकाच्या बाबतींत बरोबर नसते हें सप्रमाण व सक्रिय सिद्ध केलें. माझे स्नेही श्री. वसंत सबनीस यांनीं मुद्रितें तपासण्याचे कामीं मला फार सहाय्य केलें.

या सर्वांचा मी अतिशय आभारी आहें.

सरतेशेवटीं पण सर्वांहून अधिक आभारी मी, माझे गेल्या पंचवीस वर्षांपासूनचे स्नेही व सुप्रसिद्ध तत्त्वज्ञ आचार्य दादा धर्माधिकारी यांचा आहे; त्यांच्यावर एकामागून एक आणि एकाहून एक गंभीर संकटांची परंपरा एकसारखी कोसळत होती. प्रांतिक राजकारणांतील दगदगींमुळें त्यांचें दुबळें शरीर अतिशय थकून जात असे. तशा परिस्थितींतहि त्यांनीं हें नाटक दोनदां ऐकलें आणि आपली विस्तृत प्रस्तावना विषयाची मुळींच हेळसांड न करतां लिहून दिली. त्यांचे कितीहि आभार मानले तरी ते अपुरेच पडतील.

कवि अनिल यांच्या 'घराकडे' या कवितेंतील शेवटच्या ओळीवर, विशिष्ट परिस्थितींत चिडून, माझी 'शोभा' थोडी टीका करते. त्यांच्या 'उद्यां' या कवितेंत 'ती' स्वप्नामध्यें असतांना 'हवा तो' ( wish—fulfilment ) बदल करते. 'शोभे' च्या या प्रमादांबद्दल कवि अनिल 'तिला' क्षमा करतील असा मला भरंवसा आहे.

हें नाटक रुचणार नाहीं असा एक विशिष्ट वर्ग असणें अनिवार्य आहे. एका दिशेनें मानवी स्वातंत्र्याचा शोध, आणि दुसरीकडून त्या शोधाला

होणारा विरोध, यांच्या संघर्षांतूनच ही नाट्य–ऊर्मि निर्माण झाली. या ऊर्मीची जबाबदारी जितकी त्या शोधावर आहे तितकीच त्या विरोधावरही आहे. पण हें खरें असलें तरी तिचा तडाखा मात्र बसणार आहे विरोधाच्या खडकांनाच ! असें असतां त्या खडकांचे आभार मानणें अथवा क्षमा मागणें शुद्ध ढोंगीपणाचें होईल. म्हणून, ही ऊर्मि त्या शोधाच्या प्रवाहांत अधिक जोम उत्पन्न करूं शकेल या अपेक्षेनें त्या प्रवाहाला, आणि 'ओघानें' त्या खडकांनाहि अर्पण करीत आहे.

गोखले व्हिला, कॉंग्रेसनगर,
नागपूर, ता. ९ ऑक्टोबर, १९४८

नाना जोग